


# मोरोपंतकृत उद्योगपर्व आर्या.

रा. रा. परशुराम बल्लाळ गोडबोले

यांच्या सहाय्यानें

शुद्ध करून

माधवचंद्रोबा

यानीं

लोककल्याणार्थ

स्वताच्या

शिलाछापखान्यांत छापिल्या.

मुंबई

शके १७८२

# मोरोपंतकृतउद्योगपर्वाच्याआर्या.



सरसिजनाभ[1] सभेंत द्रुपद-विराटादि निजजनां-सहित
बैसूनि, मनीं विचारी, घ्याया साधूनि निजजनांस हित. १
प्रभु सभ्यांस म्हणे,"हो, जें झालें, तें तुम्हां सकळ कळलें;
सर्वां साधूंचें मन, परिसूनि धर्म-श्रमास, कळकळलें! २
"वसतां द्वादश वर्षें, क्षणहि गडबडों दिली न धी[2], रानीं!
केला स्वजनांत परम- दुष्कर[**] अज्ञातवास धीरानीं! ३
"आतां, सुयोधनानें यांचा यांला विभाग ओपावा;
लोपावा न न्याय स्वल्पहि, राजर्षि हा न कोपावा. ४
"सूज्ञ ब्राम्हण कोण्ही तिकडे पेषावयासि योजावा,
जो संमत[3] सर्वांला, सत्वर कौरवपुरासि तो जावा." ५
राम म्हणे,"दुर्योधन संमत आम्हासि पार्थसा, मानें
हे, तें, कुशल असावें; साधावा बलिँदनार्थ[5] सामानें. ६
"अक्षज्ञ[6] नसोनि भरीं भरला, स्वगुणेंचि अर्थ[‖] हारविला:—
पडतां गांठी, गतश्री[+] होय शशी; दोष काय हा रविला?" ७
'शिव, शिव! हर, हर!'-ऐसें बोलुनि सात्यकि म्हणे,"अगा, रामा,
धर्मासि दोष लाविल तरि, सोडिल विष्णुच्या अगारा[7] मा[8]! ८
"मानधनासि, बळेंचि, द्यूतक्रीडार्थ बाहिलें कुटिलें[9];

---

१ कमलनाभकृष्ण,-२ बुद्धि,-३ मान्य,-४ कर, हारलेलें द्रव्य,-५ सख्यानें, सांत्वनानें,-
६ फांशांविषयीं ज्ञान, द्यूतज्ञानीं,-७ गृहास,-८ लक्ष्मी,-९ वक्रमनाच्यानें,-
**: करावयास कठीण,-‖ द्रव्य,-+ निस्तेज.

लुटिलें सर्वस्व! अहो, बलदेव, स्वकांसि पाहिजे कुटिलें. ९
“याचें न धर्म युद्धें, हरिलें द्यूतें करूनि पद-कपटें;—
शक्तिचें अशक्ति न मिरवूं—झांकिलहि कसा हरूनि पदक पटें? १०
“पदर पसरितील शकुनि, दुर्योधन, कर्ण हे तिघे, राया;
नाहींतरि, त्यां माझ्या सिद्धचि आहेत होति घेराया ११
“उपदेशितील अस्मत्- छस्त्रें त्यां द्यावयासि पद-नमुनी;
हें न घडतां, न तुमचें यावरि अवलोकितील वदन मुनी. १२
“पांचाल, मत्स्य, यादव, पांडव, हे वीर काय सामान्य?
होईल श्रीहंसी, हे हंस त्यजुनि, वायसा मान्य? १३
“मारूनि सुयोधनातें, राज्यपदीं बसवितें, पहा, यास
याचेंचि [illegible] अद्भुत; रामा, आम्हां नको महायास.” १४
दुष्ट म्हण, [illegible] वदसि. योग्य खल-प्राप्तदर्प-हा निर्धना.—
पावेल [illegible] चतुरहि, न करूनि निधिस्थसर्पहानि, धना? १५
“पळहि न वळेल सामें दुर्योधन दुष्ट मत्त-अंधकसा
पुत्रस्नेहें भुलला, नयनिष्ठुर हित वदेल अंध कसा? १६
“जरि धीर, वीर,—भीष्म, द्रोण, प्रख्यात पात्र तन्नमना,
तरि दीनचि ते; त्यांच्या, त्याचें बहु लाजवील अन्न, मना. १७

---

१ मारिलें-चेंचलें,-२ राज्यपद,-३ कपटें द्यूतें-कपटी दुर्योधनानें,-४ पवित्रानें,-५ वस्त्रानें,-६ शास्त्रें,-७ लक्ष्मीरूपहंसी,-८ महत्प्रयास,-९ प्राप्त-दर्प, गर्व प्राप्तझालेला,-१० द्रव्यावर बसलेल्या सर्पाचा नाश,-११ अंधक राक्षसासारिखा, १२ धृतराष्ट्र,-१३ तत्-नमन-दुर्योधनादिकांच्या नमनास,-* मरणा.

“कर्ण, शकुनि, तो त्याचें मूर्त-कुसंकल्प, काय सांगावें !
ज्याहीं नयहंसांतें निंदावें, अनयवायसां गावें ! १८
“न शके शक्र घनांहीं शमवूं, शमवील त्या नर गडूनीं ?
सांगेल कोण दुसरा, भीष्महि सांगेल त्या न रगडूनीं ? १९
“येइल बहूपचारें वंध्यांरसिजासि काय ओलावा ?
डोलावा हरमूर्धा, कुरुपतिपूर्वींच भूप बोलावा. २०
“सांगूनि सांगणें तें, प्रेषावा आमुचा पुरोहित, हो.
त्याला न चुकावें; अंधाचे पुत्रशत उरो, हित हो. २१
श्रीश म्हणे, “तूं गुरुसा, हे आम्ही शिष्यसे चि, रायास;
“स्वपदीं स्थापावें त्वां; या देवें भोगिला चिरायास. २२
“धृतराष्ट्र मानितो तुज. तूं द्रोणाचा सखा, कृपाचाही;
विश्वास तुझ्याठायीं याचाही, आणि त्या नृपाच्याही. २३
“झाला विवाह, जातों. सर्वांमागूनि मजहि पाचारा.
साचा, राया, माझ्या चित्तखगा साधुसंग हा चारा !” २४
सत्कारिला विराटें. प्रभु गेला निजपुरा सपरिवार ;—
बहुधा घेउनि उद्धव- संमत, मग मारणार अरिवीर. २५
पांडवदूतचि पाहुनि, नृप न, मुहूर्तास, यावयाला, हो.

१ मूर्तिमंत वाईटसंकल्प, - २ न्यायरूप हंसांस, - ३ अन्यायरूप कावळ्यांस, - ४ मेघांनीं, - ५ लोटी, लाहानपात्र, - ६ बहु-उपचारानें, - ७ वंध्या-उरसिज-वांझीच्या स्तनांस, - ८ शिवमस्तक, - ९ फारदिवसश्रम, - १० चित्तरूपी पक्षास, - ११ वैरीसमुदाय, - *श्री-ईश-लक्ष्मीपतिकृष्ण, ✱ बोलवा.

जो, तो म्हणे; "भल्याच्या साह्यें सार्थक्य या वयाला हीं." २६
प्रेषि द्रुपद गुरुसि, जो संमत जीवो, तसाच काव्योही;
कीं, नरकीं न बुडावा, जोडुनि सह्रौतपातका, त्याही. २७
शल्याधास बहाया प्रेषुनि दूत, स्वयेंचि वांसवि त्या
पाचाराया जाय, - प्रणतजनाब्जांचिया शिवां सवित्या. २८
तें परिसतां, मन म्हणे त्याहि अनार्यासि, "आर्यसा धावें;
प्रियविजयापूर्वींच प्रभुला गांठूनि, कार्य साधावें." २९
जाय प्रथम कुरुप[10] तो, निजला होता प्रभु स्व पर्यंकीं:—
ज्यासि स्मरुनि निजावें स्वस्थ, स्थापूनि शीर्ष[12] अर्यंकीं. ३०
प्रभुच्या शिराकडे तो, स्वमहत्वास्तव, बसे-अर्कवि[14], मानीं.—
होईल काय हंस ब्रह्म्याच्याहि बसला, बक, विमानीं? ३१
मागुनि गेला अर्जुन, बसला पांयाकडेचि पाहत; कीं,
या विनयीं श्रीगुरुची बहु, त्या, लेशहि नसे कृपा, हृतकीं. ३२
कैसा असेल अन्य प्रभुच्या दृष्टीसमोर सामान्य?
उठतांचि तीस अर्जुन झाला—दृष्टीसमोरसा—मान्य. ३३
पार्थ म्हणे, "प्रार्थाया आलों, प्रभुजी, तुला सहायास."
कौरव म्हणे, "बहाया प्रथमचि जो पातला, पहा यास. ३४
"तुजसीं याचें, माझें, सम सख्य जसें, तसेंच सम नातें.—
संत म्हणति, 'पूर्वागत- 'साह्य[15]शिवपदीं सदा वसे[16]-मनातें'." ३५

१ हांवो, - २ गृहस्पतीस, - ३ शुक्रास, - ४ सत्-पात-पातक, साधुपालाच्यापातकास ५ प्रणत-जन-अ-नम्रजन कमलाच्या, - ६ सुखदायक, ७ सूर्यास, - ८ नीचास, - ९ श्रेष्ठासारिखा, - १० कुरुपति-दुर्योधन, - ११ पलंगावर, - १२ मस्तकीं, - १३ अरि-अंक-वैर्याच्यामांडिवर, १४ मूढ. १५ पूर्वी आलें त्याचें साह्य करणारा जो शिव त्याचे चरणीं, - १६ वासकर - अर्जुन, -

देव म्हणे, "सत्यचि हें जरि, पार्थ प्रथम पाहिला आहे;
सर्वहि संतन्यायें भेद, न आगमनिं, दर्शनीं पाहे ३६
"पूर्वागत तूं जैसा, तैसा मज पूर्वदृष्ट हा मान्य;
दोघांचेंहि करावें म्यां साह्य; प्रियतुम्ही, न सामान्य ३७
"तुजहुनि कनिष्ठ अर्जुन– बाळकसा-हें मनीं पाहा नातें;
रीति दहांनी हे कीं, पहिलें समजाविली लहानातें. ३८
"आहेत एक अर्बुद– नारायणनाम-गोप, मजसम जे
सर्वहि अनंतबल; तें समजे न परां, परंतु मज समजे. ३९
"ते, कीं न्यस्तायुध मी,-यांत तुम्हां मान्य काय दोघांस?"–
ऐसें प्रभूत्तम पुसे त्यां दैवादैवसंपदोघांस. ४०
पार्थ म्हणे, "गोविंदा, न्यस्तायुध तूंचि पाहिजेस मज."
मागे सैन्य सुयोधन! वर हि वरायासि पहिले समज– ४१
मग साह्यार्थ विनवितां, राम म्हणे, "ऐक, भारता राया;
सिद्धचि मी स्वजनातें, उतरुनियां आधिभार[४], ताराया. ४२
"वदलों विराटनगरीं त्वद्विषयक[५] किमपि जें विहित रुचलें
परि परिससि, त्या हरिसि, त्या समयीं, न सभेंत तें वचन रुचलें. ४३
"दुष्कर कृष्णत्याग, स्वप्राणत्याग हीं न दुष्करसा;
कृष्णाविणें क्षिति मला– नलिनी[६] मधुपा[७]सि जेविं शर्करसा[८]. ४४
"यास्तव सहाय, संप्रति, हा बल[९] न तुझा, न पांडुतनयाचा

---

१ यादव, – २ न्यस्त-आयुध-टाकिलें आहे शस्त्र जाणें, – ३ दैव-अदैव-संपद्-ओघ, सुदैव आणि दुर्दैवाचे संपत्तीच्या ओघांस, – ४ मानस व्यथा, – ५ करायास अशक्य, – ६ कमळ, – ७ भ्रमरास, – ८ रसरूप झालेली, कोमलेली, – ९ बलराम.

निश्चल निश्चय जाणा आजि तुम्हीं सर्व आप्तजन याचा. ४५
"जा. आहेसि क्षत्रिय; सांड. न अभिमान सांड, गा; साच
स्वर्ग असे; काळमुखीं स्नायाचा काय सांडगासाच." ४६
ऐसें वदोनि रामें, आलिंगुनि, तो खलेंद्र बोळविला.—
रविनें विधुसा—प्रभुनें स्वगृहागत मलिनही न पोळविला. ४७
अक्षौहिणी[2] कटक, कृत- वर्मा[3] दे त्यासि कीं, न येनाच
कु[4]लजा नकार[5]—जैसा —मेल्याही—पंगुला नये नाच! ४८
बहु मेळवूनि बल्लव, अज्ञ[6] पळत जाय, कृष्ण सोडून:—
अधन शिशु[7] जसा, टाकुनि चिंतामणि, बहु कपर्द[8] जोडून. ४९
चित्तांत म्हणे, "कैसा केला अरिमीनह्रद[9]-अगाध[10]-रिता!"
घ्रोंत[11], श्रुतें[12] स्मरेना कीं, हा प्रभु जाहला[13] अंगी धरिता! ५०
कृष्ण म्हणे, "पार्था, त्वां अर्बुद बल-हातिंचें-दिलें अरिला.
जो म्हणतो—'मारेना, शस्त्र धरीना,'—असा कसा वरिला? ५१
पार्थ म्हणे, "तूं मुनिनीं चित्तीं, षडरि[14]क्षयार्थ, धरिलास.
हरिला समस्तहि श्रितें[15]- ताप तुवां, म्हणुनि म्यांहि वरिलास. ५२
"न धरावें शस्त्र—असी प्रभुची आहे जरि प्रतिज्ञा, ते
राहो; त्वत्स्मरणेंचि ध्वंसि[16]ति कामाद्यरि[17]प्रति ज्ञाते ५३

---

१ शरीर,—२ दाहा अनीकांची एक अक्षौहिणी,—३ दुर्योधनास,—४ कुलीनपुरुषास,—५ न म्हणणे,—६ मूर्ख,—७ लेंकरूं,—८ कौडी,—९ अरि-मीन-ह्रद, शत्रूरूपमत्स्याचा डोह,—१० अत्यंत खोल,—११ घ्राणिष्ठ,—१२ ऐकिलेलें,—१३ पर्वतास,—१४ कामक्रोधादिक षड्वैरी त्यांच्या नाशार्थ,—१५ आश्रितांचा संताप,—१६ नाशिती,—१७ काम-आरि-अरि-मदनादिशत्रूंस,—

“सुगम त्वदाश्रितांला, देवेंद्रालाहि अर्थ असुगम जे;
त्वत्प्रेक्षितामरांतक- सेनांचे लोपतात असु गमजे. ५४
“तूं या धनंजयाचा सारथि, करुणानदा! समीरण हो.
वाटेल तेज माझें, प्रचुर मग करीन दास मी रण, हो. ५५
“व्हावा सारथि समरीं शौरि—मनोरथ मनीं असे चिर हा.
मत्प्रग्रह-प्रतोद स्वीकारुनि, मदर्थीं असोंचि रहा.” ५६
स्वजनामरद्रुम प्रभु हांसोनि म्हणे, “अवश्य. तुजला जो
अर्थ अपेक्षित, तो हो. मातलिसारथि महेंद्र तुज लाजो.” ५७
असि साधु साधुपतिसीं गांठि पडे ती—जसी अयां परिसा.
यापरि साच्या ह्याचि; प्रेमळ याच्याचि या जया परिसा. ५८
भुजबलयुक्तिबळें जो मधुकैटभकातरा अजो तारी,
त्या प्रभुला घेउनि ये तो अर्जुन, ज्या स्थळीं अजातारी. ५९



---

१ माण· २ वाटे, अर्जुनाचा, अग्निचा,-४ वायू,-५ पुष्कळ,-६ सुयोधनास,-७ मत्-प्रग्रह-प्रतोद- माझी लगाम आणि चाबुक,-८ स्व-जन- अमरद्रुम, स्वजनांचा कल्पवृक्ष,-९ मातलि आहे सारथी ज्याचा,-१० शौरस्कंधास,-११ मधुकैटभ राक्षसापासून भ्यालेला,-१२ ब्रम्हदेवास;-*. त्वत्-प्रेक्षित्-अमर-अंतक-सेना, त्वां पाहिलेल्या देवांच्या शत्रूंच्या सेनांचे,-+ सोपें.

## अध्याय २.

धर्माकडे, बहु कटक घेउनि, मद्रेश[1] यावया लागे;
तत्पूजार्थ, सुयोधन अष्टौप्रहर स्वयें सदा जागे. १
कुरुवरकृतसाहित्यें त्या शल्याचे निवास जे वाटे,
ते स्वोद्यानींच-असें त्याला, त्यांच्या भटांसही वाटे. २
जेथें उतरे तेथें, सर्व अचिंतित पदार्थ सिद्ध करी;
शल्यासि सुरनगाधिक कुरुपति-हे उक्ति कवि म्हणेल खरी. ३
त्या साहित्यें शल्य क्षितिपति होउनि बहु प्रसन्नमना,
स्वप्रेष्यांसि म्हणे, "रे, पाचारा पार्थसचिव मन्नमना. ४
"जपला बहु; प्रसादा माझ्या तो धर्मदास भाजन हो.
स्वसभेहूनि शतगुणें झाल्या मज शर्मदा सभा, जनहो. ५
"या तों सभा सभाग्या. जन हो, यांतोंचि बहु न वाखाणा;
पाहों, कूपशतांतुनि एका ऐसा, वरें, नवा खाणा! ६
"ऐसें जल, ऐसें स्थल, ऐसें आलें कधीं न अन्न मना!
मी सुप्रसन्न झालों; आणा तो निपुण पुरुष मन्नमना." ७
भेटे त्यासि सुयोधन, जाणुनियां समय कोमलाभाचा.
चित्तीं शल्य म्हणे, "बहु याहुनि भासेल कां मला भाचा?" ८
आलिंगुनि त्यास म्हणे, "इष्टार्थ-प्राणसमहि-मागावा:-

---

१ मद्र-ईश-मद्रदेशाचा स्वामी-शल्य,-२ राहाण्याचीं स्थानें,-३ योध्यांस,-४ सुर-नग-अधिक, सुरत रु-कल्पवृक्ष हूनअधिक,-५ म्हण,-६ स्वसेवकांस,-७ पार्थाचा प्रधान,-८ पात्र,-९ सुखदेणाऱ्यास,-१० विहिरी,-११ मत्-नमन-माझ्यानमनास,-१२ इच्छित,-१३ इष्ट-अर्थ-इच्छितार्थ, + मागीं

आराधिल्या वश नव्हे, – तरि थोराचाहि न महिमा गावा. ९
कुरुप म्हणे, "माझ्या तूं सेनाचा नाथ, मद्रपा, हो, गा.
अर्थीं जयलाभाचा हा भाचा, हेंचि भद्र पाहो, गा." १०
शल्य म्हणे, "आराधुनि मागितलें काय? आणिकहि मागा –
चिंतामणि देणारा, मागावें काय माणिक, हिमागा?" ११
भूप म्हणे, "हेंचि पुरें; माझी इष्टार्थसिद्धि याच वरें. –
विजयश्री येणेंचि न मजवरि ढाळील काय, गा, चवरें?" १२
"पांडव पाहुनि येतों." "या, जा; परि संभ्रमा गुंता ना कीं?
आहेचि धर्म-संभ्रम ज्ञायाचा शास्त, मागुता, नाकीं." १३
उक्ति, प्रत्युक्ति अशा झाल्या, गेले निघूनि ते राजे; –
बाहेर शल्य देखे, होते हृदयांत अब्द तेरा जे. १४
आलिंगितां प्रमोदें पांडुसुतांनीं – नमूनि, मद्रप हा
धर्मासि म्हणे, "साधो! निज-साधुत्वेंचि साधु भद्र पहा. १५
"तूं रामसम समर्थ, प्रभु, पुण्यश्लोक, लोकंमत, राया;
अज्ञातवास दुस्तर, बा, त्वदितर यासि योग्य न तराया!" १६
पूजा करितां शल्य, स्तुति करितां धर्मही बसे उगला;
पूज्यत्वें, स्तुत्यत्वें, ते न, परि ग्रंथ मात्र हा फुगला! १७
शल्य म्हणे, "बा, म्यां तो – ऐसा दुर्योधना दिला वर, हो;
तुज आशिर्वाद असा – कीं, धर्मा, धार्मिका! इलावर हो! १८

---

१ कुरुपति, – २ हिम-अग, हिमाचळ, – ३ आदरसत्कार, – ४ यम-संभ्रम, – ५ स्वर्गीं, – ६ वर्षें, – ७ हर्षें, – ८ साधावयास, – ९ कल्याण, – १० लोकमान्य, – ११ त्वत्-इतर-तुम्याखेरीज, – १२ उगीच, – १३ पृथ्वीपति, – + इष्ट-अर्थ-सिद्धि-इच्छितअर्थाचीसिद्धि, – * फिरवील.

प्रथम "न थास्तु"—मग म्हणे, "वरदान तुम्हांसि उचित, मामा, तें;
तेसा गजासि गंगा— तसि हे आशीहि शक्षचितेमा मातें. १९

"तुजकरवीं कर्णाचें सारथिपण धार्तराष्ट्र करवील;
पसरील पदर तेव्हां सारथ्यगुणप्रतोद धरवील. २०

"तेजोवध कर्णाचा, अर्जुन वांचावया, करावा,—हें
दे दान;-करीन असें म्हण;-आण न,बा दयाकरा! वाहे." २१

मद्रप म्हणे, "करीन;- स्वस्थ रहा,-दुःखसिंधु आटेल;-
वाटेल स्वमतसें;-त्वत्कीर्ति त्रिभुवनांत दाटेल. २२

"बलवत्तर विधि देतो थोराला थोरल्याचि तापातें!
इंद्रप्रमुखसुरांसहि, जें भावि, न लंघवेचि, बापा, तें! २३

"पावे सभार्य शक्रहि, पूर्वीं, बहु दुःख,-ऐक, बापा, तें;-
कीं होय विश्वरूप ब्राम्हण मारूनि, पात्र तापातें. २४

"त्या वरि वृत्रवध करी, आधीं देऊनि त्यासि विश्वास;
ब्राम्हणवधानृतानें लाजे, दावी न वदन विश्वांस. २५

"शक्र जळांत, मखादिक सद्व्यवहारहि अराजकांत बुडे;
उत्सव पळे, वळावीं तापिं मुनि त्रिदशचित्तरूप पहुडे. २६

"देवांनीं सन्मुनिंनीं, देउनि वर, नहुष अमरपति केला;
स्पर्शावया शचीला पाहे;-दवें जेविं कल्पलतिकेला! २७

"सुरमुनिसन्मंत्रांहीं कांहीं नाहींच नहुषें बळला, हो;—

१ तापलेल्या,-२ आशिर्वाद,-३ अतिपवित्र,-४ दुर्योधन,-५ दया-आकर, दयेचीखाण,-६ अतिबलिष्ठ,-७ दैव,-८ होणारें,-९ भार्यासहित,-१० लोकांस,-११ इंद्राणीस,-१२ दवाग्नि,-१३ कल्पतरूस,-१४ नहुष,-* यज्ञादिक,-+ सत्-मंत्र-हितबोधांहीं

भाग्यमदांत मनोभू-[1] ग्रग्रह शिरतांचि, बहु स्वचळला, हो. २८
"गुरुला शची म्हणे, 'हो, नहुषीं कांहींच धर्म, नय नाहीं.
कैसें तुम्ही पहावें ऐसें हें पापकर्म नयेनांहीं ? २९
'न परस्पर्श स्वप्नीं तुमच्या या धर्मकन्यकेला हो;–
प्राणत्याग सतींनीं केला कीं, अन्यकांत केला, हो ?' ३०
"तीस गुरु म्हणे, 'वत्से, धैर्य असोंदे; उगी, नकोंचि रडों.
माझ्या माथां दे हा, तूं या चिंताभरें नको निरडों.' ३१
"सभय सुरऋषिहि म्हणती, 'शचि, हा अत्युग्र नहुष, न भलागे;
हूं म्हण; बाई; याच्या धाकें कांपावयासि नभ लागे! ३२
'अजि आचार्य, तुम्हीं तरि सांगा; जरि काय नहुष पाहेल,
राहेल तेज न किमपि. याचा दृक्पात कोण साहेल ?' ३३
"जीव म्हणे, 'हो कांहीं:– त्यागावें कसि शरणआलीला ?
मी काय? सत्क्रियाचि व्यसनीं या न त्यजील आलीला!' ३४
"नहुषासि स्वमुखेंचि प्रार्थाया युक्ति सत्वरा शिकवी;
धाडी सतीस, अवेंना आशी देउनि, सत्वराशि कवी[11]. ३५
"तो पाहुनि तीस म्हणे, 'ये, मज भज; सुमुखि! पावलों स्फुरंता[12].
झालों इंद्र जगाचा, मग मजसीं इच्छिसी न कां स्मरता?' ३६
"प्रार्थुनि शची म्हणे, 'द्या कांहीं अवकाश या नते[13] जनातें;
नाहींच हरि[14]–असा हो, निश्चय मग मीं करीन भजनातें.' ३७

---

१ मनोभू-उग्र-ग्रह-मदनरूपउग्र पिशाच्च,– २ न्याय,–३ नेत्रांहीं,–४ होवो,–५ अति-उग्र,–६ दृक्-पात-दृष्टिपतन,–७ गृहस्थान,–८ संकल्पांत,–९ सखीस,–१० रक्षणाकरितां,–११ ज्ञाता,–१२ देवपण,–१३ नम्रजनास,–१४ इंद्र,–

“नहुष म्हणे,‘जा; वेड्ये! जोडुनियां पापविसर[1] त्या पतितें[2]
वांचावें केविं? विसर तूं धर्मन्यायविसर त्या पतितें[3]. ३८
‘जा. शचि, नाशचि झाला प्राप्त, महाघें[4] करूनि, पहिल्याला.
असलाहि काय[5] पापी, कैसा आलिंगवेल अहिल्याला? ३९
‘जा; अवकाश दिला. परि, सत्वर हो पूर्णकाम[6]; हो दारा
राज्यश्री ज्या भजली, तूं न भजसि तूर्ण[7] कां महोदारा[8]?’ ४०
“आली पुन्हा गुरुकडे, मग तो देवांसमेत विष्णूतें
प्रार्थी; म्हणे,‘प्रभो! हो[9], अघ जाउनि, राज्यलाभ जिष्णूतें[10].’ ४१
‘हयमेध[11] जिष्णुकरवीं करवा; विजया, सुरवा मग न वाणी!’
निर्जर-कर्ण-चकोर-[12] जोत्स्ना—असि जाहली गगनवाणी[13]. ४२
‘दूर उडविला होता जो, केवळ तूलसा[14] चि, अघवातें[15],
तो हुडकिला सुरांनीं; करिता झाला सुकर्म मघवा[16] तें. ४३
‘झाला शक्र, परि भ्याला त्या नहुषाच्या असह्य वर्तेजा[17];
पाहों न शके भगवान् भानुहि[18], डोळे करूनि वरते, ज्या! ४४
“पुनरपि हरि[19], शतयोजन- विस्तृतेंकासारपद्मनालांत[20],
बिसतंतुमाजि राहे—जो मान्य समस्त लोकपालांत! ४५
“नेली शची उपश्रुति- देवीनें त्याहि नलिननालांत;

---

१ पापसमुदाय, – २ पतन पावलेल्यानें, – ३ पतीस, – ४ महा-अघ- महापापें, – ५ शरीर, – ६ पूर्णमनोरथ, – ७ लवकर, – ८ महा-उदारा, – ९ होवो, – १० इंद्रास, – ११ अश्वमेध, – १२ निर्जर- कर्ण- चकोर- जोत्स्ना– देवांच्या कर्णचकोरांस- चंद्रप्रभेसारखी, – १३ आकाशवाणी, – १४ कापुसासारिखा, – १५ पातकरूपवायूनें, – १६ इंद्र, – १७ वररूप तेज्यास- किंवा श्रेष्ठतेजास, – १८ सूर्य, – १९ इंद्र, – २० [illegible]

त्यांसि म्हणे सुरपति, 'या ऐशा कां संकटांत आलांत?' ४६
"प्रार्थुनि शची म्हणे, 'व्हा प्रकट, धरा वज्र-तेज-उत्साहा;
अज्ञातवास न भला, प्रभुजी! प्रसवेल फार कुत्सा हा! ४७
'त्यागा वयाशचीला न तुम्हीं, हरि, योग्य तें हि न रमेला!
मागुनि तुमच्या श्रीतें, टपतो स्त्रीतें हि नहुष नर-मेला! ४८
'तुमच्या पदच्युतिस्तव मजहुनि बहु नित्य अभ्रमु रडे, हो;
नाथ! वळा जी! चातक- रुत आइकतांचि अभ्र मुरडे, हो.४९
"शक्र म्हणे, 'नहुषाचें दुःसह वर-तेज; साहवेना तें;
हें ही न सोसवे, जें आपत्पूरांत वाहवे नातें. ५०
'मी किति! न हष्टिपुढें निज-तेज न रक्षिजेल मत्तातें!
श्रीमद करिल पदच्युत, अल्पें काळें, तया प्रमचातें! ५१
'जरि खळपरपुरुषाचें असदुक्त तुझ्या मनासि बहु खातें,
तरि जाचि भेट, मतिमति सति, अति रतिदाससीचें नहुषातें.५२
'म्हण, 'मजकडे, महर्षि- स्कंधीं देऊनियां स्व-शिबिका, या;
हें मत्प्रिय बहु काय? छेदी, पक्षीप्रियार्थ, शिबि काया! ५३
"जाय शची; शक्र म्हणे, 'पावो श्रीभगवती उमा नवसा:—
राहे उगाचि विधिवरि भर घालुनि—संकटीं सुमानवसा. ५४
"देवी नहुषासि म्हणे, 'कथिन प्रियवचन, जरि न फिरवालः—
बैसुनि अपूर्व यानीं, जरि या अमरावतींत मिरवाल, ५५

---

१ अपकीर्ति,—२ इंद्राचीहत्तीण,—३ चातकाचाशब्द,—४ आपत्-पूर, विपत्तिरूपपुरांत,—५ सोयरें,—६ लक्ष्मीचागर्व,—७ असत्-उक्त-वाईटभाषण,—८ ज्ञाते,—९ अनुरक्तदास,—१० नहुषातें,—११ महा-ऋषि,—१२ पालखी,—१३ शिबिराजा,—* इंद्र,—*: दैवावर

'जरि, अद्भुत प्रताप प्रकटूनि कराल मन परम हर्षी,
होइन वशगा, जोडा शिबिकेसि समाधिधनपर महर्षी.' ५६
"बहु रवल नहुरव लवकरी, स्त्री हरिची आपणासि वशेगा हो
म्हणुनि, चढे ऋषि यानीं, गंधर्वांला म्हणे, 'स्वयश गा, हो.' ५७
"मुनि म्हणति, 'देवराया, ऐसें हें अयशही न कां गावें?
गोप्रोक्षणमंत्र तुम्हां प्रमाण, कीं अप्रमाण, सांगावें?' ५८
"नहुष म्हणे, 'गोमारण- मंत्र सकल अप्रमाण; गो, विप्र,
एकचि; अवध्य कुळ हें:-पुसतां, रे, काय? हूं, चला क्षिप्र.' ५९
"करितां विवाद, कांपे नहुष वदे-'सर्प, सर्प'-हे वाणी;
चरणें अगस्त्यमुनिला कामात्मा दुष्ट तो शिरीं हाणी! ६०
"अवमानिलें असे मुनि, मंत्रहि, पोषूनि गर्व, ते ज्यानें,-
चैतन्यें वायु तसा-तो संत्यजिलाचि सर्व तेज्यानें! ६१
"घटज म्हणे, 'रे, मंदा! दुर्गतिद तुला त्वदीय दर्पचि हो;
हाणुनि विप्र शिरीं पद, जरि म्हणसी 'सर्प, सर्प;' सर्प चि हो!' ६२
"गर्वेंचि नहुष पडला, अनुतापें हरि पुन्हा पदीं चढला;
हें समजे, श्रेंद्रनें सद्गुरुपासीं कुबुद्धि जो पढला. ६३
"ऐसें दुःसह संकट शक्रासहि लागलेंचि भोगावें;-
साधुजयद हें म्हणउनि, ऐकावें, मारना; विभो, गावें. ६४
"शक्र तसा-प्रभु तूंहि स्वपदातें पावसील, बा, पार्था;

---

१ समाधि हेंच धन ज्यांचें त्यांत श्रेष्ठ, – २ आज्ञाधारक स्त्री, – ३ गो-प्रोक्षण-मंत्र-गोहननमंत्र, ४ माराया(स) अयोग्य, – ५ त्वरित, – ६ चला, चला, – ७ आत्म्यानें, – ८ अगस्त्यमुनि, – ९ दुर्गति देणारा, – १० गर्व, – ११ पश्चात्तापें, – १२ आलस्य कुईनें, – १३ साधूंस जय देणारें.

नहुष तसा- दुर्योधन;-कीं, याची रीति तापपापार्थी." ६५
करुनि समाधान असें, गेला रक्षावया स्ववचनातें.-
सत्य गुरुनिष्ठ मद्रप दुसरें न गणीच, जेंवि कच, नातें. ६६



## अध्याय ३

अक्षौहिणी मिळाल्या धृतराष्ट्राच्या सुताकडे अकरा;
परि धर्मनयविहीना! काय सुहेती जशा जना अकरा? १
सात अजानरिपुकडे,- झाल्या या,त्या मिळोनि अकरा, हो;
धर्म म्हणे,"यश राहो."- खळ दुर्योधन म्हणे,"स्वहठ राहो." २
धृतराष्ट्रप्रमुखांतें भेटोनि, द्रुपदगुरु म्हणे,"परिसा.
सुतदुक्ता हितकामें, धनकामें जड म्हणों नये परिसा. ३
"धृतराष्ट्र, पांडु, दोघे एकाचे पुत्र-पितृधनविभागी;
हें वचन अनादरितां होइल सुरगुरुसभेसह विभागी. ४

---

१ बृहस्पतीचा पुत्र, - २ धर्म-नय- विहीन-धर्मन्याय नाहीं ज्यांत, - ३ चांगल्या तलवारा,
४ हस्तरहितालो, - ५ तेजोरहित, - ६ वाणी.

“सांगा सुयोधनाला, पावाचे पांडुपुत्र अंशाला;
भीष्मा, न स्पर्शावें धृतराष्ट्राच्या, [1]अभद्र, वंशाला. ५
“तिकडे सात असोंद्या; इकडे अक्षौहिणी जरी अकरा,
अक्षौहिणीसहस्त्रा- सम सात्यकि, भीम; [2]सामे कांन करा? ६
“त्यां, यां, तुम्हां समस्तां- हुनि अर्जुन अधिक; कृष्ण त्यापरिस;
परि सर्व सामकामुक. कां मुकसि सुरवा, सुयोधना? परिस.”७
भीष्म म्हणे,“द्रुपदगुरो, तूं ब्राम्हण म्हणुनि तीक्ष्ण वदसि; परि,
[3]सदसिं [4]परिस्फुट शब्दींचि कार्य कराया समर्थ-[5]सदेसिपरि. ८
“[6]राज्यार्धभाक् युधिष्ठिर, म्हणतों अर्जुन समर्थ-शिवसा-मी,
कृष्णजगत्प्रभु;-कलहीं [7]अशिवेंचि सर्वत्र, विपुळ शिव सामीं. ९
[8]सभ्यश्रुत्यमृत असें. जों बोले सर्व-[9]भारतेश तदा,
कर्ण म्हणे,“राहोंद्या पाल्हाळ;-कशास तेंचतें शतदा? १०
“अज्ञातवास पूर्ण न झालाचि, द्रुपद-नृप-पुरोहित, हो.
द्वादशवर्षें पुनरपि वनवासें स्पष्ट पण पुरो, हित हो. ११
“कां-मूर्खसा- युधिष्ठिर, अर्थकरन्याय, समय सोडून,
उडतो, अनर्थकर, लघु पांचाळ-तसेच मत्स्य जोडून? १२
“निजबाहुबळें तरला मारुतिकीं, अब्धिला [10]अलांबु बळें?
होय भला इष्टार्थ- ग्रह उपनेत्रींचि कीं, भला बुबळें? १३
“देइल [11]नयें समस्तहि, अनयें प्रभु राज्यभाग चवथा न.-

---

१ अकल्याण,-२ संधि,-३ सभेमध्यें,-४ स्पष्ट,-५ मरवररवङ्गाप्रमाणे,-६ राज्य अर्ध-भाक्- राज्यार्धाचा भागी,-७ अकल्याण,-८ सभ्य-श्रुति-अमृत- सभ्यांच्या कर्णाला अमृताप्रमाणे सरवें,-९ भारत-ईश- भरतवंशश्रेष्ठ, भीष्म;-१० भोंपळा,-११ न्यायाने

स्वापत्यासचि दे, कीं व्याघ्रीचें भलतयासि च+व थान ? १४
"सांगा त्यां मूर्खाला कीं, रक्षा प्राण-पालका समया
या प्रभुकडे, विभाग प्रार्थाया, साधु-बालकासम या. १५
"त्यजितिल धर्म-समय जरि, युद्धचि केवल हटेंचि वरितील,
तरि ती लयासि जाइल कीर्ति; चमू अश्रु-मोक्ष[1] करितील". १६
भीष्म म्हणे, "राधेया! उत्तर-गोग्रह तुला न आठव दे.-
समरं जें विजय तुज, तुझी पाहुनि असकृत् रणांत पाठ, वदे. १७
"गांडीव स्वहस्तुनें जिंकावें, रजत[2] तरि न कां कथिलें?
स्वाल रणीं रज[3], मदसह, न करुनियां या महर्षिचें कथिलें[4]". १८
कर्णासि निवारुनियां, जोडुनि देवव्रतासि[5] हातातें,
अंध म्हणे, "जें सन्मत[6] अस्मद्धित[7], सत्य वदसि, ताता, तें. १९
"द्रुपद-गुरो! बा, तूं जा.-तुजमागुनि संजयासि पाठवितों.-
मी पांडु-पांडवांतें घटिकेंत सहस्रवेळ आठवितों!" २०
तो पांचालपुरोहित जातां, पळभरि उगेचि राहून,-
पाहून विचार मनीं,-वृद्ध म्हणे संजयासि बाहून[8]:- २१
"गाल्गाणे! न झाले पुरुष कुरुकुळांत, सत्य, पांडवसे.
यांचें विष्णुयशासम सुयश, व्यापूनि सत्यपांड[9], वसे! २२
"भजले, भजतीलहि बहु;-गुरुसेवेतें सुधा समजतात.
मानिति मनांतुनि प्रभु पांडव परमोऽबुधास[10] मज तात! २३

---

१ अश्रुपात-रडणें, -२ रौप्य, -३ मृत्तिकाकण, -४ सांगितलेलें, -५ भीष्माला, -६ सत्-मत- साधुमान्य, -७ अस्मत्-हित, -८ बोलावून, -९ सत्य-प- अंड- सत्यलोकाचा स्वामी त्याचें अंड-ब्रम्हांड, -१० अत्यंतमूर्खास, -+ रुचि

"हातींहि चित्रगुप्तें यां विषयीं घेतली नसेल वही.
केसें, काय लिहावें?—कीं पुण्य अगण्य, अंघ नसे लव ही. २४
"द्वेष अशा साधूंचा रुचला या कुरुकुळांत मत्तनया,
कीं क्षुद्रा या कर्णा:—लंघिति हे दुष्ट-भाग्य मत्त-नया! २५
"हा भाग पांडवांचा—मंदात्मा—पाहतो हरायास;
ऐकुनि नुमजे—निष्फळ जो पार्थपरा भवीं हराऽयास! २६
"कृष्णसखव्यासीं युद्धीं होईल रहांत हा कसा मान्य?
नृहरिपुढें चि असती हरि;-मग देईल हाक सामान्य? २७
"उलतिल युधिष्ठिराच्या उष्ण-कटाक्षें कडे हिमाद्रीचे!
न असे भीम, जनार्दन, मज भयद; न पुत्र तेहि माद्रीचे. २८
"यास्तव युधिष्ठिराला भेट, बुधा! कुशल पूस; जाच कसा.
साधुविरोधें मजला परलोकीं सोसवेल जाच कसा? २९
"सूज्ञा! मद्वचनें तूं कुशल सकल-वृष्णि-पालका पूस.—
ज्याच्या प्रताप-लक्षण- वह्निपुढें होय काल कापूस! ३०
"धृतराष्ट्र साम्यकामुक; आपणचि युधिष्ठिरासि वळवावें,—
हें सव्यसाचि-सचिवा—सदया श्रीकृष्णजीस—कळवावें. ३१
"वळवील धर्म-मन तो; न म्हणेलचि साधु तुच्छ सामास.—
नीतींत तसें खळमन—जेविं नळींत श्व-पुच्छ सो मासे." ३२
संजय युधिष्ठिरातें—भेटुनि निघितें जसा निवे दीन.

१ पातक,-२ मनु-तनय-सुयोधनाला,-३ हर-आयास-महादेवाचाश्रम,-४ उलट
तील-तुटतील,-५ ह्रासा,-६ वृष्णि-पालक-यादव पालक कृष्ण,-७ अग्नि,-
८ संधि इच्छिणारा,-९ अर्जुनाच्या प्रधानास,-१० कुत्र्याचें शेपूट,-११ साहा,-१२ महिने.-[illegible]
सतात

कुशल पुसोनि म्हणे,"जी, आज्ञेनें तात-मत निवेदीन." ३३
धर्म म्हणे,"तात विदुर, भीष्म,द्रोणादि कुशल आहेत?
रे,संजया! असावे सर्व सुखी—या मनांत हा हेत. ३४
"कर्ण बरा आहे कीं? कुशल असावें सदा वदान्यानें.—
जो याचकासि म्हणतो,'जें वस्तु प्रिय, सुखें वदा,त्या तें'३५
"ताताज्ञेंत सुयोधन आहे कीं? विप्र-वृत्ति चालवितो?
बहुधा युयुत्सु दुसरा? तात सदा,साधु,भक्त काळवितो? ३६
"ताताऽभिप्राय कसा? वद:—सांनिध्यें तुला सकळ कळतें.
काय पुसावें? पितृमन, चिंतुनि दीनां सुतांस, कळकळतें!"३७
सूत म्हणे,"प्रभुजी! ते आहेत बरेच नीरोगत तरुसे.
तत्कुशल काय पुससी, बा,ज्यांवरि धर्म-नीति सतत रुसे? ३८
"ताताऽभिप्राय मला पुसतां जरि, तरि समस्त परिसा,हो;
परि साहो मन:—तुमचा महिमा गुरुसाच मान्य परिसा हो. ३९
"त्व तात-मनीं आहे, स्वापत्य-शिवार्थ,साम-कासुकता.
म्हणतो,'सुखा दशमुख,न धरिता पर-विषय-काम, कां मुकता?
"परि,तुमचा भाग तुम्हा देउनियां, शीघ्र संधि करवीना;—
इच्छी कुलहित नाग वि. भाग न अर्पूनि,संधिकर-वींना. ४१
"आतां शीघ्र करावें स्व-पर-हित तुम्हीच, साम साधूनी.—
धरिला न कधींच परा- स्वर्थघ्न स्वार्थ-काम साधूनीं. ४२

१ दात्यानें,—२ विप्रांचीउपजीविका,—३ भात,—४ जवळ असल्यानें,—५ नदी-च्याकिनाऱ्यावर असणारे,—६ कल्याणार्थ,—७ परस्वलोभ,—८ संधिकरणाऱ्यापाशांस,—९ पर-अस्त्र-अर्थ-घ्न-पर प्राणअर्थनाशक,—+ सर्प.

"स्पर्श, जड हि, हित करि, जरि अपराधांच्या रची अयशतातें.-
बुध हो! युष्मद्योगें जोडावें काय, जी, अयश तातें? ४३
"जरि आग्रहें कराल ज्ञातीसीं, धरुनि राज्यकाम, रण,
धामे, रणन्मणिनूपुर[४] यौवनहि, गमेल मरण[+] आमरण! ४४
"राज्यश्री-मदिरेच्या[*] निर्वृति कवणासि हो दिली पानें[७]?
त्यजिली कां भरतानें? त्यजिली तेंसीच कां दिलीपानें? ४५
"श्री अनुभविली, आतां नित्य-सुख-यथार्थ शांतिस वरा, हो.
परिणाम-शोक-कर ह्या स्व-गुरु-प्रमुख-आप्त-शांति-सव राहो." ४६
धर्म म्हणे, "रे, संजय, मी सिद्ध, न सिद्ध जनक सामातें.
जाणोनि सर्व, दाटुनि दूषिसि तूं-साधु-जन-कसा मातें? ४७
"निंद्य स्वधर्म-विच्युत,-मी तरि युद्धासि सिद्ध उत्साहें.
धर्म-न्यायाऽनुसरण पावाया योग्य काय कुत्सा हें? ४८
"सदनुमतें क्षिति अर्पुनि सत्सुखकरीं, निवे दिलीप.-तिला
गोंचूं नयेचि सुज्ञें- जैसी कन्या निवेदिली पतिला. ४९
"जरि हे न सोडवावी- द्यूतजिता द्रौपदी तसी-मही स्यां
तरि भरत-कुळ-गुरूंच्या लागेना बोल काय, गा, महिम्न्यां? ५०
"होइन निंद्य दहांत, न सोडवितां श्रीस, संजया, परिस-
कुलांच्या यशाचि-न विधिस हि बहुमत हरिनाभिकंज[११] यापरिस. ५१
"हरि कुरु-कुल-हित इच्छी-तोकाचें[१२] नित्य माय जेविं हित.-

१ परिस,-२ लोह,-३ ग्रह,-४ रणत्-मणि-नूपुर-यौवन- वा वाद्यमान् मणिनूपुरांनीं शोभायमान् तरुणपण,-५ मरणपर्यंत,-६ सुख, तृप्ति, मोक्ष,-७ शासनानें,-८ आप्तगुरुप्रमुखआप्तांचाक्षपरूपयज्ञ,-९ निंदा,-१० कुलिनाश,-११ विष्णूचें नाभिकमल,-१२ बालकाचें,-+ स्मशान,-* मद्याच्या,-॥ शोकमानूनये.

करिन तसेंचि, प्रभु हा– सर्वज्ञ–कथील काय जें विहित." ५२
श्रीकृष्ण म्हणे, "सूता, सर्वांत गृहस्थ-धर्म सन्मत, रे.
या आश्रमांत सर्व, स्व-पराचें सफल करुनि जन्म, तरे. ५३
"कर्म कसें टाकावें? जी अमृत मुखांत मायसी ओती,
ती सद्विद्या कर्म- त्याग नकरितां चि फळवती होती. ५४
"रवि, शशि, लोक-पति, धरा प्रमुख सकळ कर्म-सिद्ध हें समज.
कर्म-जल तृप्ति-दायक; वाटे नैष्कर्म्य जेविं पळस मज. ५५
"दूषील कोण वर्णा- श्रम-निरता, भरत-सत्तमा राया?
योग्यचि हा साधु सकल रक्षाया, सर्व मत्त माराया. ५६
"दस्यु-दमन हा मुख्य क्षत्रिय-धर्म-प्रमाण थोरांस;–
यास्तव मारावें या प्रभुनें दुर्योधनादि चोरांस. ५७
"दस्यु-दमनार्थ शक्रें चाप-कवच-शस्त्र निर्मिलें आहे;–
आहेत घना चातक– तैसे धर्मा, करूनियां आ, हे. ५८
"हे अधिक!–काय दुर्बल ते, रात्रौ यालिती दरवडा जे!
लुटिलें धन दुःख नसे; परि हृदयीं बहु कुवाद-रव डाजे. ५९
"ते नं भले न स्त्रीचा नग्न करिति, हरुनि सावलें, काय?
नव्हतों सभेंत आम्ही, म्हणुनि लुटायासि फावलें काय? ६०
"जासाग त्वद्वनें ऐकावें हेंचि वाक्य अंधानें,–
आहेत सिद्ध पांडव सेवाया प्राण बाण-संधानें ६१
"देतां विभाग, करितिल पांडव धृतराष्ट्र-दास्य –दास तसे.

१ भरतश्रेष्ठास, –२ शत्रूचें अथवा चोरांचें मर्दन, –३ अपवादशब्द, –
४ वस्त्र, –५ शरीर, –+ वृक्षविशेष, –ॐ तस्तास.

नाहीं तरि खल मर्दुनि   हास्य—मज असें भविष्य भासतसें." ६२
संजय निघे, तयाला   धर्म म्हणे, "आयका   यश तें[+] गावें
द्या पांच ग्राम.—न दे   दासाला राय काय शत गावें? ६३
"ताताला, भीष्माला,   सांगावीं पाय धरुनि मन्नमनें;
जोडुनि हस्त म्हणावें—सामें[⁕]   करावें चि सुप्रसन्नमनें! ६४
"आचार्य, द्रोण, कृप   प्रार्थुनि, प्रथम कथुनि मन्नमना,
म्हण—साम भलतसें मज   बहुमत—दुकाळांत[++] जेविं अन्न मन्ना. ६५
"सांग कनिष्ठ पित्यातें—बंधु-विरोधासि चित्त भी माजें[‡];
करवा साम भलतसें;—देइल हरि इष्ट वित्त भीमा जें. ६६
"कर्णासि वद—सख्याला   आवर; विजयासि आवरील हरी.—
समयीं प्रवृत्ति आवरि   थोर—जसा सिंधु आवरी लहरी. ६७
"सांग नृपासहि हें कीं,   साम शुभचि; तयांत नाव रायाचें:—
सुगति वरायाचेंचि,—न कर्म उचित यातना वरायाचें. ६८
"गांधारीस म्हणावें—पंचोत्तरशत असोत तनय.—शातें
तृप्ति नसोचि तुज.—करी जेणें गातील साधुजन यश तें. ६९
"माझ्या सुयोधनादि   भ्रात्यांच्या बायकांसि कळवावें
कीं, स्वहितार्थ तुम्हीतरि   एकांतीं कांत-चित्त वळवावें. ७०
"क्लीब-द्वारप[२]-दासी-   जन-वामन[३]-कुब्ज[४]-दास-दायांतें
पुशिलें अनामय[५]—असें   सांग.—पुसावेंचि, वा, सदा यांतें. ७१

---

१ मनाचा ओघ,—२ द्वारपाळ,—३ खुजा,—४ कुबडा,—५ आरोग्य,—+ राहावें;—
⁕ सख्य, संधि,—++ दुष्काळांत,—‡ माझें.

"कुरुकन्यांसि म्हणावें-तातें पुशिलें तुम्हांसि.-ज्या तातें
श्री देउनि, न दिली ही स्वःकन्या-श्रीद-पारिजातातें." ७२
ऐसें अजात रिपु-मुख-शशि-मंडल अमृत तेंवि वाचिक वी;
तें बहु असोंचि-विस्तर- व ग्रंथ प्राकृतीं न वाचि कवी. ७३
गेला तेव्हां वाटे- ओढुनि दुर्दैव संजया नेतें.-
धरिलें होतें जें कवि- सुकवच हरि-पाद-कंज यानें तें. ७४
धृतराष्ट्रासि म्हणे, "मी संजय;-आलों तया सुताकडुन,-
वैर ज्वरीहि म्हणती यत्कीर्ति सुधाब्धिच्या उता कडुन. ७५
"श्रमलों बहु. मज आज्ञा द्यावी, श्रित-सुरतरो! निजायास.
सांगेन सभेंत उद्यां प्रभुवाक्-तरि भय तरोनि जायास." ७६
जातां सूत, अनिद्रा- स्त्री भेटे-नूतनाचि-रायास.-
कीं, संतोषा वाळा ये चिंता-पूतना चिरायास! ७७
स्मरतांचि विदुर भेटे, सद्वैराख्या प्रजागरामाजी,
सेवुनि वांचेल कसी म्हणत्या गुरुस प्रजा गरा माजी. ७८
विदुर म्हणे, "हा आलों. आहें पायासमीप, राजाजी.
एथेंचि म्यां बसावें.-तीच तया योग्यता परा ज्या जी. ७९

---

१ द्रव्य,-२ लज्जा,-३ देवकन्यांस श्री देणारा जो पारिजात वृक्ष त्यास.- कित्येकांचें म्हणणें असें आहे कीं, देवकन्या, श्रीद-कुबेर, आणि पारिजात, या तिघांस लाजन आणली.-तथापि वर घेतलेला अर्थच युक्तसा दिसतो. ४ भाषण,-५ ज्याला लाउत्तम कवचरूप,-६ कृष्णचरणकमल,-७ यत्-कीर्ति-सुधा-अब्धि- ज्याच्या कीर्तिरूप अमृतसागराच्या,-८ हे आश्रितांच्या कल्पवृक्षा,-९ सत्-वैर-आख्या- साधुवैर नामक,-१० जागरणांत,-११ विषास.

* 'माझी प्रजा, गरा सेऊन, कसी वांचेल?-म्हणत्या गुरूस,'-

"कोणा कार्याकरितां रात्रीं स्मरला तुम्हास हा जन,[1] हो?
स्वस्थ आह्मां कीं? आज्ञा काय? म्हणेत प्रसाद-भाजन[2] हो." ८०
धृतराष्ट्र म्हणे,"वत्सा! तुजहूनि इतरास काय सांगावें!
आलें असे कपाळा कीं, निंदुनि हंस, वायसां[3] गावें! ८१
"निडकुनि येउनि, सूतें केलें पाण्यापरीस पातळ!-तें
सांगावें काय, सख्या!-जें हृदया गरलसेंचि[4] आतळतें? ८२
"वदला,'सांगेन उद्यां धर्माचा धर्म-धाम संदेश;[5]'-
चिंतेंत बुडाला हा, स्फुज्ञा! त्वद्बंधु सर्व-मंदेश![6] ८३
"निद्रा येईल कशी? मच्चिंता[7] होय काय सामान्या?-
शूर्पनखीसी हे, बा!-तुज हा अतिभार कायसा, मान्या? ८४
"बहु धर्मार्थकुशल[8] तूं वद, या जें श्रेय असंदवस्थागा[9]
निववूं मज बोल तुझा-जैसा पीयूष-रस[10] दवस्थागा.[11]" ८५
विदुर म्हणे हो,'प्रभुजी! बळवंतासीं प्रसंग ज्या पडतो,
स्पष्ट प्रजागर तया- हीनबला, हीनसाधना-घडतो. ८६
"कीं जो हृत-धन-कामी, तस्कर,[12] रात्रीं न नीज ये त्याला:-
देवा! ऐसा कांहीं दोष नसे कीं तुम्हा कडे आला? ८७
"अथवा, परवित्ताचा अभिलाष[13] नसेल कीं मना रुचला?
हा बहु पापद, तापद!-यापरि कटुकी[14] न कटु, न वीं कुचला![15] ८८

---

१ नतजन,-२ प्रसादास पात्र,-३ कावळ्यांस,-४ विषासाररवें,-५ निरोप,-
६ मूर्खपति,-७ मत्-चिंता,-८ धर्म-अर्थ-कुशल,-९ असत्-अवस्था-ग वाईट अवस्थेस पावलेला,-१० अमृतरस,-११ दवस्थ-अग-वणव्यांतील वृक्ष
१२ चोर,-१३ लोभ,-१४ विकत्यार्थी,-१५ काजरा.

भूप म्हणे,"भाशूं दे धर्माऽमृत-कवल-बोळ कानांहीं.-
खसम सत्समयज्ञ स- धर्म-पति जवळ बोल का नाहीं." ८९
विदुर म्हणे,"जो आस्तिक,-गुरु वेदोक्तीं जयास विश्वास,-
मीपणा ज्यासि न शिवलें,-तो पंडित मान्य होय विश्वास. ९०
"दुर्लभ वस्तु न वांछी,-न करी जो नेष्ट-वस्तुचा शोक,-
आपत्तींत न मोहे,-त्या पंडित म्हणति जाणते लोक. ९१
"विद्या नसोनि उद्धत,-धन नसतां जो उदारपण वाहे,-
अर्थासि नीच-कर्मे जो संपादावयासि जन पाहे,- ९२
"नसतां लाभ यशाचा, दाटूनि करी परार्थ जो यत्न,-
मित्रार्थी कपट करी, तो साक्षात् मूढजनशिरोरत्न. ९३
"मित्रत्व दे अमित्रा,-जो मित्र-द्वेष दुष्ट-कर्म करी,-
तो मूर्ख असें म्हणती पुरुष-परीक्षा कळे जयासि खरी. ९४
इत्यादि बहु वदे तें सोडुनि, आली कथाचि आर्यांत;-
निजपरिवार त्यागुनि, जसि भगवन्मूर्ति गोप-भार्यांत. ९५
धर्माऽर्थ-काम-मोक्ष- प्राप्तीचे सिद्ध मंत्र- ते बोल;
मोल न करवे त्यांचें धनदासहि! सिंधुहूनि जे खोल! ९६
सत्य,प्रिय,हित,सर्व- श्रुति-शास्त्र रहस्य, विदुर कथि बोले;-
तो लेलिह जाणो त्या प्रभु-वेणुरवाऽमृतें निवे,डोले. ९७
भूप म्हणे,"बा सुज्ञा! दे सर्व तमोंसि भीति, परि सवि त्या

१ इंद्राजवळ, २गेलेल्या-नासलेल्या, ३विपत्तींत, ४उन्मत्त गर्विष्ठ, ५मूर्खशिरोमणि, ६कुबेरास, ७सर्प, ८नादरूप अमृतानें, ९अंधकारास.

भी न गुह्यातम.-तेंविं न तुज पुत्र-प्रेम नीति-परिस्रवित्या. ९८
"पांडव साधु यशस्कर, अयशस्कर सुत असाधु हे गमतें;
रमतें मन उपदेशीं, पुत्रस्नेहासवें पुन्हा भ्रमतें. ९९
"पुरुषप्रयत्न दुर्बळ, दैव बहु प्रबळ,-मज असें कळतें;
असता बलवंत पुरुष- कार, तरि कधींच चित्त हें बळतें. १००
"कथिलें नसेल तें वद,-सांगावें फार काय हो कवितें?
सेवावें सेव्य जन्हीं, पुत्र-प्रेमाऽम्ल-पित्त ओकवितें!" १०१
विदुर म्हणे,"राजेंद्रा! उरलें अध्यात्म तें सुजातानें
सांगावें, परिसावें.-याकरितां श्रीसनत्सुजातानें १०२
"केली असे प्रतिज्ञा,मृत्यु,-म्हणति,परि नसे असी कांहीं.
तद्वदनें परिसावें तें तत्व तुम्हीं विचाररसिकांहीं." १०३
भूप म्हणे,"तच्छ्रवणीं माझें अत्यंत मानस त्वरतें;
सांगावें, सर्वज्ञा! मज तें आतां तुवांचि तत्वरतें." १०४
विदुर म्हणे,"आर्या! तें सांगावें ब्राम्हणें,न अन्यानें;
ठावें,परि न वदावें स्वमुखें म्यां शूद्रयोनिजन्यानें." १०५
भूप म्हणे,"या देहें त्या मुनिचा संग मज कसा घडतो?
केवळ नीच मनुज हा,-अमृत-फळांचा समुच्चतर घडतो!" १०६
चित्तीं विदुर म्हणे,"बा! तुज कथिलें तत्व जें तुझ्या तातें,
या दासासि कथावें त्यां, करुनि कृपा,सनत्सुजाता, तें. १०७

---

१. नीतिपरिस्रवित्या तुज-अथवा संबोधनार्थी, २.पुत्रस्नेहरूप आसवें-मद्यानें, ३.प्रयत्न, ४.आम्लपित्त-रोगविशेष, ५.सनत्कुमारानें, ६.हलका. ठेंगणा, ७.अत्यंत उंच. अतिमान्य.

येउनि सनत्सुजातें कथिलें अध्यात्म-शास्त्र अंधातें,
जें नत्काळ छेदी सुहृदतसा ऽनादि[1]-मोह-बंधातें. १०८



## अध्याय ४

आले सभेंत सर्व प्रातःकार्थांच, -त्यांत संदेश
सांगे संजय; परिसति भीष्मादिसुधीश, ते हि मंदेश. १
संजय म्हणे,"अजी धृत- राष्ट्र महाराज!-सानुजें धर्में
द्रोणादिकांसह तुम्हां वंदुनि, तुमचीं विचारिलीं शेमें. २
वदला जिष्णु असें कीं, 'माझ्या ताता-समक्ष मंदेशा
दुर्योधना सभेंत स्पष्ट समग्राहि सांग संदेशा. ३
'सावध होउनि सत्वर आम्हां अस्मद्विभाग, ओपावा;
कोपावा न वृकोदर-[4]अहि, न तुझा आयु-वायु लोपावा. ४
'साचें याची काळा- हूनि उणी एक तिळहि न गदा हे;
न मरावे बहु बंधु त्वन्नाशें,-जेविं नाग नगदाहें'. ५
"लोभदुरभिमानातें, रक्षाया प्राण, यश, कटक, टाकीं;
यमसम यम समरीं हे पाहुनि म्हणसील तूं 'कटकटा!' कीं. ६
"जागवितो हित-हस्तें सुमना तुजला हि ह्या निरोपानें;

१ अति दृढ अनादि अविद्यारूप बंधास, २ मंद-ईश- मूर्खपति दुर्योधनादिक,
३ कुशलें, ४ भीमरूप सर्प, ५ आयुष्यरूप वायू, ६ हत्ती, ७ पर्वतदह
नानें.

धर्म-क्षोभें होइल, तसि न हराच्याहि हानि रोपानें[1]. ७
"हा श्रीकृष्ण प्रभु जरि काय क्रोधें करूनि पाहेल,
राहेल कोण कटकीं भट? कीं काळासही न साहेल. ८
"सोसेल रुद्र-चक्षु, प्रस्फुट जरि वरिल शोणनेत्रा[2] तें?
दीप्तालय विघ्नबाधा हाटुनि घालील कोण तेलातें? ९
"गांडीव ज्यांत, तो सुर- पतिसहि नेंदील[4] विजय-लाभ रणं;
कुरु-राज्य तुज न साजे,- प्रभुचें चोरास जेविं आभरण. १०
"स्पष्ट बुडविनिल शिकवुनि कुमति शकुनि, कर्ण, हे तुम्हां,-तारा;
कां शोकांत बुडवितां, बालिश हो! जन्महेतु म्हातारा? ११
"धृष्टद्युम्न, शिखंडी, सात्यकि, अभिमन्यु, हे न सामान्य
वृद्ध द्रोण, पितामह;- शतहि खळ तुम्हि दहां नसा मान्य. १२
"द्यूत न अजातरिपुसीं,-भीमासीं जीवनघ्न संगर हा.
रंग रहाया, धरुनि द्रोण-विदुर-भीष्म-बुद्धि-संग, रहा. १३
"दे भाग;-अभय देइल धर्म महाराज हा अवनतातें
न गणुनि दोषशतातें, करिल,-करावें जसें अवन[11] तातें १४
"युद्धचि करीन म्हणसी, परि पश्चात्ताप बहुत बाधेल;
धर्म-न्याय-विरोधें कोणाचेंही न इष्ट साधेल. १५
"जरि तूं सानुज[12], साप्त[13], प्राप्तमहोत्कर्ष आजि सामरसा[14],
पामर-साम्य वराया इच्छिसि कलह, त्यजूनि सामरसा[15]." १६

१ बाणानें, २ आरक्तनेत्रास, ३ इंद्रासही, ४ नदेईल. ५ अज्ञ हो, ६ जन्म कारण, ७ धृतराष्ट्र, ८ प्राणनाशक, ९ युद्ध, १० शरणागतातें नम्रातें, ११ रक्षण, १२ स-अनुज, १३ स-आप्त, १४ स-अमरसा, १५ संधिरूप रसास.

ऐसें धर्मानुमतें, कृष्णानुमतें,उदंड वदला, हो.—
तें बहु काय वदावें ?-'शीघ्र अजातारि राज्यपद लाहो.' १७

भीष्म म्हणे' 'कुरुराया! ऐक करुनि सावधान कान,मन;
दोघेचि देव न करिति पूर्वीं श्रीसत्यनायका नमन. १८

"तेव्हां पुसे बृहस्पति विधिला कीं,'सर्व सिद्धि-सदनमुनी,
शक्राद्यखिलसुरहि कृत- कृत्यचि होती त्वदीय पद नमुनी. १९

'विश्वगुरो! कां गेले न नमुनि दोघेचि देव हे नूतें?
कुतुकीं सभा बुडतसे, याच्या स्वमुखेंचि सांग हेतूतें.' २०

"वदला विधि कीं,'ते श्री नर-नारायण, तपो-निधान मुनी,—
होती विज्वर सद्यः प्रेमें ज्यां भवमहागदी नमुनी २१

'मजेज त्यांपुढें किति! कां ते प्रभु मुख्य विश्वपाळक, हो;
महिमा अनंत त्यांचा; त्यांसम ते त्रिभुवनांत बाळक,हो!' २२

"जाय सुरेश्वर होते ज्या स्थानीं तपत ते प्रभू तरणी;
मागे वर कीं,'द्यावें सान्द्र मजला यश प्रभूत रणीं.' २३

"शरणागत-शक्रा यश देती होउनि सहाय बहुदा ते;
तदुदारत्वें गतमद मग म्हणतिल कां न 'हाय!' बहु दाते? २४

"जे प्रभु नर,नारायण,- ते अर्जुन,वासुदेव,अवतरले.
वदला असेंचि नारद,-ज्यांच्या बोलें असंख्य भव तरले. २५

"यांसीं विरोध करिती जे जे,ते वंचिती असु स्वलेशीं!

---

१ अर्जुनमतें, २ ब्रह्मदेवास, ३ तुझेचरण, ४ आश्चर्यांत, ५ ब्रम्हा, ६ तपःसागर, ७ संसारमहारोगी, ८ बहुत, ९ प्राण, १० खल- ईश-दुष्ट, ✢ पर्वतज, ✣ ज्वररहित, ✤ तत्काल.

जे यांसि ह्मन जोडिति, त्यांसि स्वप्नीं नसे असुख लेश. २६
"दुर्जात, कितव, खल जे,—ज्यांच्या लाविति यशास डाग मती,—
आम्हांहुनि कर्ण, शकुनि, दुःशासन, हित तुला, जडो! गमती. २७
"गांडीव-सुदर्शन-धर नरनारायण समर्थ अमरांत;
बसतिल एकरथीं, रथि- सारथि-भावें करूनि, समरांत. २८
"मेरुहि खचेल, राया, श्रीधर्माच्या उलोन कोपानें;
हो सावधान या श्री- मदन्मद्याच्या भुलों नको पानें. २९
"तुज काय! शत्रुसहि मी न स्वप्नांतहि कथीन अहितातें.
मणिहार घालिजेतो शिशु-कंठीं, कीं महोग्र[4] अहि तातें?" ३०
कर्ण ह्मणे, "हो पंडित! करितां सद्धर्म-निरत कुत्सा, हें
अनुचित; मी पांडववध करुनि, करिन मित्र-कार्य उत्साहें. ३१
"हा क्षत्र-धर्म-निष्ठ स्तुत्य; तिळहि अघ नसोनि यास कसा
निंदिसि? न दोष लाविति सुजन न लावून सोनियास कसा. ३२
"अजि! पूर्व-विरुद्धांसीं करिती कोणीहि तरि शर्म नयज्ञ?
राज्य-स्वर्ग-फलार्थी सिद्धिस नेतीच अरि-शमन-यज्ञ." ३३
भीष्म ह्मणे, "धृतराष्ट्रा, देईल दहांत दैन्य हें मत, रे..
खल-मल्ल-संसर्गास्तव न रण-कसीं गुरुहि सैन्य-हेमें तरे. ३४
"दावील सूतसुत[11] हा, हित ऐसें लेखिल्या, विनाशपथा;
विधि-च्योतहि पतंग, खळहि, न वळति, फळ देखिल्याविना, शपथा[12].

---

१ हितेच्छु-मित्र, २ मूर्खा, ३ प्राशनानें, ४ महान क्रूर सर्प, ५ निंदा, ६ पातक, ७ कसोटीस, ८ साम-संधि, ९ युद्धरूप कसाचे ठायीं, १० सेनारूप सुवर्ण, ११ कर्ण, १२ ब्रम्हदेवाच्या शपथेस.

"हा पावला असे निज- गुरुपासुनि भंगजनक शापातें;
पापातें वाग्दंडें ताडिति गुरु,भूप-जन कशापातें. ३६

"अवलंबिला तव सुतें भीमाब्धि तरावयासि हा प्लव,गा!
मारुति भंग घडेल प्रचुर-चणक-चर्वणोद्धता प्लवगा? ३७

"एकैकें पांडुसुतें केलें जें कर्म यासि दुष्कर तें;
वाचाळनीचसख्यें न फळ, जसें वंध्यदारशुश्रूषकरतें. ३८

"सिंहें मृगसा-पार्थें गोग्रहणीं गांठिल्या स्वभावातें
त्यजुनि, पळाला! कैसा स्मरत नसे या मळ-स्वभावातें? ३९

"कोठें गेला तें हा, पार्थें हरितां सुकीर्तिसह वासें?
बुडती च अकुळज्यांच्या सत्कुळज्यांचीहि कीर्ति सहवासें. ४०

"रे धृतराष्ट्र,जनित-सुत- शतमिष-विष-विषम-स्वरत राधे! या
गंधर्व बद्ध-दुर्यो- धन-मोचन-वृत्त पूस राधेया. ४१

"पांडव दया न करिते, तरि ते अरि तेज सर्वही हरिते;
होतों मुनि-पीत-जलधि- कुक्षि-नसे विगत-सार कां न रिते? ४२

"आतां बहु गर्जतसे, मत्तवृषभसा,सभेंत निर्त्रप हा.
याच्याचि बळें पांडव- परिभव करणार पुत्र! चित्र पहा." ४३

द्रोण म्हणे,"हेंचि करा; भरतर्षभ! सत्यसार वदला,हो.
पद लाहो धर्म.—उचित शुचितम शम.—यशाचि घ्या,न वदला,हो.

"शूर,रण-क्रूर,सकळ — काळतसे—तदपि ते दयालु वरे.

---

१ परशुरामापासून, २ पाप्यांस, ३ राजसेवक, ४ चाबुकानें, ५ लहान नौका, ६ बहुत चणे खाऊन उन्मत्त झालेल्या, ७ वानरास, ८ यत्नें, ९ नीचकुलांतल्यांच्या सहवासानें, १० कर्णास, ११ निर्लज्ज. १२ भरतश्रेष्ठ-भीष्मा.

पांडव सुयोधना सुख देतील अपार,-खेद या लुब्धें. ४५
"असति बहु धनुर्धर, परि पार्थ सदा नव्यसाचि.- समराया
हट काया भट कोया सजिल कवण सव्यसाचिसम,राया?"
अंधापासुनि पावे भीष्म-द्रोणोक्तही अनादर तें;
जेविं अनादरिजे हरि- हरकीर्तन सुबधिरें,अनादरनें. ४७
सभ्य म्हणति,"हा!हाही धरितो जसि धरिति कामना संदेरी;
हा!जनरीति असी,मग कविच्या येइल न कां मनास दरी?"
वृद्ध म्हणे,"रे संजय, अकरा असोहिणी चमू श्रवण
करुनि, अजातरिपु कसें वदला? नृप बोलिले कसे, कवण?
"आम्हांकडे मिळालें बहुबल हें परिसतां अनीचेष्टा
धर्मा कैसें गमलें? केली तेणें कसी जनीं चेष्टा? ५०
"रनला जरि मोहमद- राज्यश्रीसीं बळेंचि मंद,रतो.-
कोणी असें म्हणे कीं, 'न शमाया शत्रुसिंधु मंदर तो.' ५१
"आज्ञार्थ युधिष्ठिरमुख कवण पहाती धरुनि समरेहा?
समरे हा त्यांच्या ओपुनि आर्थीस मानस मरे,हा!" ५२
संजय म्हणे,"नृपाळा, सद्दा त्याचें धनेच्छु संसारी
देखति जसें मुख,तसें धर्माचें भीम, जिष्णु, कंसारी. ५३
"आज्ञेचीच पहाती वाट.- स्तविती नृपाळ -भाट तसे.
क्षिप्र जयार्थ निघावा प्रभु-वाक्यांसहि असोंचि वाट तसे. ५४

---

१ हितबुद्धि न ऐकून हट्ट करणारे कर्णादिक, २ नवीनसाच, ३ शरीर, ४ अर्जुनासारिखा, ५ अत्यंत बहिऱ्यानें, ६ साधूंचे शत्रू, ७ अ-नीच-इष्ट-साधूंस इष्ट ऐशा, ८ शत्रुसागर, ९ मंदरपर्वत, १० समर-ईहा- युद्धाची इच्छा, ११ शुद्दा.

भूप म्हणे,"कलह नव्हे कार्य, तरि नयासि कार्य कां गमला?
आम्हांसीं कोणाच्या सामर्थ्यें भांडणार, सांग मला? ५५
ऐसें सभेंत पुसतां, तो काळग्रस्त-बुद्धि जाणोनी,
पडला मूर्छित संजय, चित्तीं भावीअनर्थ आणोनी ५६
विदुर म्हणे,"राजेंद्रा! खचित्ताला असत्य न गमो—हा
संजय पडला कीं,जी; झाला वश, जरि महाजनग, मोहा" ५७
भूप म्हणे,"बहुधा हा भ्याला भीमादि-योध-तेज्यानें.—
भ्यावाचि तो, निरखिले सहसा सक्रोध योध ते ज्यानें" ५८
सूत उठोनि म्हणे,"हो, करणार प्रभु तुम्हांसवें कलहा
धृष्टद्युम्नबळानें.— द्रोणवधोत्पन्न कीं महाबळ हा? ५९
"जो बक-हिडिंब-मागध- कीचक-कर्मीर-शमन भीम रणा
चिंती, बहु न विलासा;— ज्याचें स्वप्नींहि न मन भी मरणा; ६०
"जो गंधमादननगीं क्रीडे, प्रभु जेविं एकला भवनीं;
क्रोधवशा वधुनि, वदे—'मज मोठा हाचि एक लाभ वनीं;' ६१
"त्याच्या बळें तुम्हांसीं धर्म प्रभु भांडणार, बा राजा.—
जपला विराटनगरीं बहु; बहुत वनींहि अब्द बारा ज्या. ६२
"ज्या श्रीगांडीवधनु- र्वल्लीनें सत्यपांड वानी ती,
देवी दे ती युद्धो- त्साह, दुजी सत्य पांडवा नीती. ६३
"जो भांडला शिवासीं,—प्राप्त हरि-हर-प्रसाद होरा ज्या,

१ महाजनांतगमनज्याचें, २ मूर्छेस, ३ संजय, ४ बकादिराक्षसांचा शमन- करणारा, ५ क्रीडेस ६ क्रोधवशानामाकुबेरानुचर, ७ वर्षें, ८ संग्राम, ९ हरिहरप्रसादरूप मुहूर्त.

त्याच्या बळें तुम्हांसीं धर्म प्रभु मांडणार, हो राजा. ६४.
“यक्षें पुरुषत्व दिलें ज्याला, जो धैर्यसन्नग शिखंडी,
करणार तद्बळें रण; – कीं तो गांगेयपन्नगशिखंडी. ६५
“जो वासुदेव भगवान् सर्वाश्रितकामकल्प-नग, राया
त्याच्या बळें सुरपुरा घेइल; मग कां न अल्पनगरा या? ६६
“करिल न्याय-ब्राम्हण- सत्पुरुषाशीर्बळेंचि कलहानें;
होतिल अजात रिपुच्या भग्न रणांत क्षणांत खळ हातें.” ६७
प्रज्ञाचक्षु म्हणे, “हे सर्वहि एकीकडे महाबाहू,
एकीकडे वृकोदर; – मत्सुत्रातें रणीं न हा बाहू! ६८
“[illegible]ापासूनि भीतों मी, – हरिपासूनि जेविं काळविट;
घेइल हा न वधाचा विट, – घेइल एकवेळ काळ विट ६९
“अस्त्रीं गुरुसम; – कोपीं हरसम; – वेगीं हि वातसम जो; ग”
देवा, मंद सुयोधन, भीमविरोधें स्वघात समजो, गा ७०
“नीज न ये रात्रिंदिवस; भीमाचें लागलें चि मतिला १
आझूनि वांचलों कीं – उरले द्यूतांत, याचि अतिलाभें ७१
“म्हणतों मरूं नका, रे, भीमकरें; मारवूं नका राजे;
परि न वळती. कसे तर- विळ, गुरुच्या लंघिती नकारा जे? ७२
द्देवासुरांहि दुःसह भीम, – असो सगद, कीं असो अगद;
अग-दर्पाला वज्री, – अरिदर्पाला हि होय हा अगद! ७३

---

१ धैर्याचा उत्तम पर्वत, २ भीष्मरूप सर्पाविषयीं मयूर, ३ सर्व आश्रितांच्या मनोरथाविषयीं कल्पवृक्ष, ४ न्यायाच्या आणि ब्राम्हणसत्पुरुषांच्या आशीर्वादाच्या बळानें, ५ धृतराष्ट्र, ६ धोलावू, ७ हरिण, ८ निबंध, ९ गदेसहित, १० गदारहित, ११ पर्वतगर्वाला, १२ इंद्र, १३ औषध.

'राजर्षिवर युधिष्ठिर, त्याचा ब्रह्मास्त्रसाचि विश्वास;
याची काय कथा? तो भस्म करील क्षणांत विश्वास! ७४
"भीष्म-द्रोण-कृपांहीं,-परमाप्तांहीं, सदा सहायांहीं,
भुज-बुद्धि-बळें दिधला व्यसनांत पडों न दास हा यांहीं. ७५
"आतां यांहीं आर्य- व्रत कैसें जीवितार्थ सोडावें?
सोडावें कैसें मन? अपयश कैसें नवेंचि जोडावें? ७६
"कर्ण-सदय, प्रमादी; गुरु-भीष्महि वृद्ध; पार्थ तरणा, रे.-
आहेत काय कोठें- तरि बाहुबळें समुद्र-तरणारे? ७७
"भीमार्जुनाच्युत रणीं मथितिल अदितितनयां सकटकांतें
आलें, येइल ही जें, नृप-बळ, वधितिल न यांसकट कां तें? ७८
"तें सत्य होत आलें, विदुरें जें भोंवि घातलें कानीं;
केला, पहा, कसा हा, येउनि पोटासि, घात लेंकांनीं! ७९
"जो मज ताप कुमन्त्रें,-गिरिसहि पविच्या न दाविला पातें;
न तरेन वृद्ध मी सुत- शोक-घनज-विष-नदा विलापातें." ८०
संजय म्हणे, "पहावा स्वतनुज परिणाम जो भला तातें;
नाचोंद्दिला सुत गृहीं, धरुनि द्यूताभिधा अलातातें. ८१
"तत्कालिन ये वदनीं, न मनीं ये कीं करील हा हानी;
झालें दीप्त अलातें जें गेहें, विझेल काय हाहानीं? ८२
"आजुनि तरि टाका, कीं, प्रभु हो, कौरालयांत हा कोंडो;

१जगातें, २असाध्य, ३ भीम-अर्जुन-अच्युत, ४ देवांला, ५होणारें, ६वज्राच्या, ७ पुत्रशोकरूपमेघापासून उत्पन्न झालेल्या विषाच्या नदाला ऐसा, ८द्यूत-अभिध-पूर्णनामक, ९ज्वलनकाष्ठांस, १०गृह, ११ हाय हाय! करून, १२कुलशाखेंत, १३कोंडून ठेवा.

प्रेमकरें एरवादे ते कण साराल यांतः-हा कोंडा! ८३
"होय न तें शंख-शतें, जें शिव एकेंचि दक्षिणावर्तें;
लोक इयीं स्मरवे श्री पात्रीं देवूनि दक्षिणा, घर्ते. ८४
"लटिक्याचि अनीशत्वा धरिसी;न बधेल या सभा सोंगा.
हितकर, परि परेसे तुज जरि आम्ही आप्त दास भासों, गा." ८५
तेव्हां सुयोधन म्हणे, "अजितात! मदुक्तिलाहि परिसा, हो.
बहुतचि
"पांडव-भय न धरावें. झाले पांडव कुव्यांत ते ज्या, तें
आम्हांसहि प्रसवलें.- जाणे जग आमुच्याहि तेजातें. ८७
"धर्मासि भेटले जें कृष्णादि श्योल सर्व हे रानीं,
बदले राज्यहरण, म- हृध,-तें कथिलें समस्त हेरांनीं. ८८
"तेव्हां अभय दिलें मज भीष्म-द्रोणादि सर्व-गुरु-गुरुंनीं
देवी-हरिश्चित्ताचें वनहारि हरितील काय गुरुगुरुनीं? ८९
"स्वाधीन-मृत्यु भीष्म, द्रोणहि उग्रप्रताप;-हा रथिला
जिंकिला याच्या तेजें कोणाचा न प्रताप हारविला? ९०
"वारवाणिलें मज बळें,- भीम मजपुढें धरील न गदेतें.
गुरुचा प्रताप बहु दे; याहुनि अत्यल्प कल्पनग देतें. ९१
"ध्याले पांडव आम्हां,- कीं प्रार्थुनि पांच मागती गांवें
यश आमुचें कवीला वाटे गावूनि, मागती गावें! ९२

१अन-ईशत्व, २ भ्रूसारिखे, ३ मेवणे, ४ दूतांवीं, ५अति-अल्प, ६ कल्प
वृक्ष, ७ पुन:, ८ कल्याण.

"ज्याचा तात अयोनिज,- माधवहि; ह्या वीर काय सामान्य?
अश्वत्थामा सर्वां धन्वधरां रामरायसा मान्य. ९३

"सहज कवच-कुंडल-धर, रविसा तेजोनिधान कर्ण-वह्नि
चिंता यास.-यशोरत्ना-ऽमृत-रत्नार्चित-नृकाय अर्णव ह्या! ९४

"कांपत असेल शक्रहि, परिकुनि माझ्या सुयोध नामातें.
बाहेल कोण योद्धा समरीं राया सुयोधना मातें? ९५

"केशव,सात्यकि, दोघे,-पांडुतनय पांच,-सात हे तिकडे;
त्यांत हि हरि-प्रतिज्ञा असि कीं, पाहूंनयेचि हे तिकडे. ९६

"भगदत्त, शैल्य, भीष्म, द्रोण, कृप, द्रोणि, कर्ण, हे त्रिपद
वीर मजकडे; यांचे रविसहि आच्छादितील होतिपद! ९७

"भ्यालां कां, हो तात? स्वस्थ रहा; पांडवांसि गिळितील;-
शिळितील वायुसहि हे.-चारिदिवस ते भिशांसि पिळितील. ९८

"भीमातें मारिन मी, वधितिल कर्णादि फाल्गुनासि पणें;
रिपुरक्ताचें खेळों, पाहुनियां समर-फाल्गुना, सिपणें." ९९

धृतराष्ट्र म्हणे,"सूता, युद्धकथा कोण, काय, वदतात?
वंद,-परिसो सुत; परिसो गुरु; परिसो कीर्ति-नीति-पद तं..... १००

संजय म्हणे,"शिखंडी म्हणतो,'भीष्मासि ठेविना सत्य;
धृष्टद्युम्न म्हणे,'मी द्रोणा-रोगासि जेविं नासत्य. १०१

"निज भाग कल्पिलासे मद्रेश युधिष्ठिरें,-अहीन-कुळें;

१ धनुर्धरांस, क्षत्रियांस;-२अर्जुनास, ३युद्धरूपफाल्गुनमास, ४ हे संजया,
५ भीष्म, ६ अश्विनीकुमार, ७उत्तमकुळें.

शतहि सुत तुझे भीमें स्वविभागत्वें, जसे अही नकुळें. १०२
"अर्जुन वदला,'येतिल दुर्जय वैरीभ नक्र सम राजे-
कर्ण, जयद्रथ, मुख सुख- कर माझा भाग,-शक्त समरा जे.'
"अभिमन्यु बोलिला कीं, 'मोडा यालूं नये चि इतरांनीं;
द्यावा मज दुर्योधन- दुःशासन-पुत्र-भाग पितरांनीं.' १०४
"नकुळ असें वदला कीं, 'भाग उलूकादि आपले खावे
मह्यायांनीं;-नाहीं तरि त्यासम होंहि पाप लेखावे.' १०५
"नकुळानुजप्रतिज्ञा ऐसी ही परिशिली मुखानें, हो,
कीं-'शकुनि आपुल्याचि व्यसु पापी परि शिलीमुखानें हो.'
"आवश्यक क्रिया जी, शीघ्र तुम्ही घ्याच उरकुनी तीतें;
कोणाचा अनचरतां लोकांत उरेल उर कुनी तीतें?" १०७
अंध म्हणे, "दे त्यांचें त्यांला. केल्या जरि प्रतिज्ञा, ते
सज्जन करितिल करुणा;-रक्षिति नम्रा अरिभति ज्ञाते. १०८
"ज्यांच्या बळें उडसि, ते तिकडेचि मनेंहि, तुजकडे देहें;
साम करावें त्यांसीं,-बा, मज वृद्धासि एवढें दे हें" १०९
"ते होंहि एकजाती; ते होंहि क्षोणिवरि रहातात;
मग, त्यांचाचि विजय कां? काय म्हणावें तुम्हां, अहा! तात!
"न बळें तुझ्या, न गुरुच्या,-न गुरुसुताच्या न याहि आजाच्या-
स्वबळें, कर्णबळें, मी हरणार असुंसि धर्मराजाच्या. १११

---

१ मुंगुसानें, २ वैरी-इभ-नक्र-सम, ३ नकुल-अनुज-सहदेव, ४ धि-असु-प्राणरहित, ५ बाणानें, ६ पृथ्वीवरि, ७ प्राणांस.

"करितिल समरीं माझ्या ते, मी त्यांच्या करीन मथना कीं;
भोगीन भाग्य एथें, कीं ह्याचि धरूनि भव्यपथ, नोकीं. ११२
"अतिसूक्ष्में सूच्यग्रें जितुका भू-भाग होतसे विद्ध,
युद्धाविना न देइन,- जरि ते तितुकाहि घ्यावया सिद्ध." ११३
प्रज्ञाचक्षु म्हणे "रे, देईल न एकवेळ विष मरण,
अशनिहि, दहनेंहि;- परि जो भीमासीं, तो अतीव विषम रण!
"न करीं दुराग्रह, अरे;- वत्सा! हो सावधान, रे; शम रे.-
त्यजितां जळ, मीन तसा,- धर्म-नय त्यागितां नरेश मरे. ११५
"खवळेल भीम हरिसा! मन्मतिला तों असें गमे-रुरुसे
व्हाल तुम्ही! कीं विधिवरि, त्याचें ऐकोनि सत्व, मेरु रुसे. ११६
"नग जगतीवरि न तसे, न तुटतिल धृतोंयुधा क्रतोरा जे.-
भीमा भी माझें मन; दुःसाध्य न या एथास्फता राजे. ११७
"ज्या आहित पितृ-पितामह, सांगावें काय त्या मग दहांनी?
स्मरसिल मद्वच जेव्हां प्राणाची करिल तो सगेद हानी. ११८
"संजय, कंज-यशोहर- नयन कसें काय बोलिला, वद, रे.-
आइक.- हो स्मरपद, रे- मद-रेचित सघ शोनिधे! संदरे! ११९



---

१कल्याणमार्ग, २ स्वर्गी, ३सूचि-अग्र, ४वज्र, ५अग्नि, ६फारच, ७थंडहा, ८सिंहासारिखा, ९मृगासारिखे, १०ब्रम्हदेवावर, ११ वृक्ष, १२ हत्यारधारणकर्त्यास, १३ स्तनारास, १४शत्रु, १५गदाधर, १६ कमलयश हरण करणारीं नेत्रें ज्याचीं, १७गर्वें करूनि केला आहे जय पशमचा समुद्र ज्याणें ऐशा, १८सत्-भरी-हे साधू ज्याशत्रो.

## अध्याय ५

संजय म्हणे, "पुसाया गेलों लोकेक-नायका, यदुज्या,
तेव्हां वदला प्रभु तें कथितों; सांगों रहस्य काय तुज्या! १
"एकीं शयनीं होते नरनारायण, पिऊनि हाला, हो;
मद्दर्शनामृताचा आज्ञेनें घे, भिऊनि, हो लाहो. २
"जेथें अभिमन्यु, नकुळ, सहदेव,-अशांसही न शिरवेच,
तेथें शिरतां, कवणा न म्हणेल स्वापराध 'शिर वेंच?' ३
"ध्याउनि ज्यासि निवाले सज्जन,-अमृतें जसे न हाले;-तें
कृष्णाख्य तेज निजलें होतें, राया, पिऊन हालेतें. ४
"कृष्णा, भामा,-देवी-साक्षात् देवीच ज्या जना दिसती-
होत्या कृष्णांपाशी.-हरि-हर-निकटीं जशा अनादि सती. ५
"जेणें किरात-रूपि- प्रभुसीं केला प्रसिद्ध वाद कली,
तो मजकडे स्व-पादें कांचन-मय पाद-पीठ, बा, ढकली. ६
"शरणागतोधिगिरिचें, बा, केलें ज्या कृपाकरें पीठ,
प्रभु-युग वंदुनि, महिवरि बसलों, स्पर्शूनि, नृपा, करें पीठ. ७
"वदलों, वाचिक सांगा, आलासे दास हा निरोपाला.-
कुरु संतति तुलसीच्या स्पर्शी द्यावी न हानि रोपाला. ८
"मद्वचनातें परिसूनि, पाहूनि द्रोपदी-वदन, रगडी

---

१ कृष्णास, २ भय, ३ हा मी संजय, ४ योगमाया लक्ष्मी, पार्वती; ५ भिल्लरूपी महादेवाशीं, ६ शरण आलेल्यांच्या भयोमयारूप पर्वतांचें, ७ पिठ, ८ आसन, ९ बोलावयाचें, निरोप; १० कृष्णार्जुन,

ादवाया स्वांकस्थ श्रीभीमाजानिचें पद नरगडी. ९
"पार्थ म्हणे, 'यदुराया, वाचिक या संजयासि सांगावें;
पिकपतिपुरें वसंती पृथुकानें, त्यजुनि पान, कां गावें?' १०
"श्रीकृष्ण उठोनि म्हणे, 'संजय, दुर्योधनासि सांग असें—
धारासार करुनि, यम- सदना जायास साप्त सिद्ध असें. ११
'गोविंदा, धांव! असें व्यसनीं मारुनि सभेंत हाकेला,
या कृष्णेनें तेव्हां- पासुनि केवळ ऋणीच हा केला. १२
'फेडायास्तव करितों तेरा वर्षें हि जप, तप, रिणा मी;
वाहीं न शकें; असतें हें घाया दुःख जपत परिणामीं. १३
'जे त्वत्सहाय, आम्ही- भीमार्जुनशौरि हे तिघे त्यांतें
मारूं रणांत; सोडूं तृणघेत्यांतें,-न हेतिघेत्यांतें." १४
"भूप म्हणे, "पुत्राच्या अभिमान पिता धरील हा नियम.
धर्म-प्रियार्थ, वत्सा, त्वत्कटकांची करील हानि यम. १५
"मारुतहि, कसपटेंसीं, कटकें कुतुकें करूनि उडवील;
विजयध्वजस्थ मारुति सर्वांसहि सागरांत बुडवील. १६
"शक्र त्रिदशांकरवीं त्वद्वीरशिरोबुजांसि खुडवील;
चिंतुनियां ऐरावत वैरा, बत! वादि-वीर तुडवील. १७
"संरक्षितील नानो- पायें त्यां वैद्यराज, नासत्य;
ज्यांच्या बळें उडसि तूं दैवबळ नसेचि त्यां जनां, सत्य." १८
हांसुनि म्हणे सुयोधन, "धरितिल सुर काय, जी नवी प्रकृती?

१ भायापति कृष्णानें, २ कोकिळेपुढें, ३ बालकानें, ४ पिणें, ५ शस्त्रघेणारांस, ६ अश्विनीकुमार

ऐसें न म्हणति नारद- मार्कंडेयादि जीने, विप्र, क्षेती. १९
"जरि काम-कोप-लोभ- ईषांतें क्रूर मनुष्यसे धरिते,
तरि कां न, काननाप्रति जातां, प्रिय-पुत्रसात्य ते करिते? २०
"माझ्याठायीं केवळ मनुजबळ न,- दैवबळहि बहु वसतें.
नानोत्पात शमवितों मीहि.-असें मच्चरित्र बहुवस तें! २१
"गड बड, गडबड, करिती जरि तीव्र, न पावतील परि भूतें;
परिभूतें होतीलचि मन्मंत्र बळें, पळांत, अरि-भूतें! २२
"जें शक्य, अशक्य, ध्यातों, सिद्धिप्रति पावतोंचि, नाता, तें.
मेघांतें, दहनांतें, वर्तवितों मी;- तसेंचि वातातें. २३
"स्नेह तुम्हांसि भिववितो, आच्छादुनि निरुपमाहि मन्महिम्या
उद्भासिजेल कसाहि जसि- तसि लीलें करूनि मन्महि म्या. २४
"स्वल्पें काळें पुत्रें पांडव मथिले.- असोंचि परि साल:
कठिन दगडाचीही मी, कोणहाहि न निघेल परि, साल. २५
"स्वश्लाघा न करीं, परि तुमच्या आश्वासनार्थ हे शब्द;
इतरां पुसोनका, हें प्रज्ञानेत्रें तुम्हींच हेरां, हो." २६
कर्ण म्हणे,"त्यजिजे तो, जो दुर्लभ-वस्तु-काम' लोभा नें.
गुरुपासीं, ब्राम्हण मी,- ऐसें वदलों महास्त्रलोभानें. २७
"कळतांचि कपट, वदला, कीं, 'अस्त्रस्मृति नसेल तुज अंतीं.'
भस्मचि करिता, परि बहु- कारुण्यामृत, न कोप-विष संतीं. २८

---

१ हृद्द, २ प्रवीण,- ३ नाना-उत्पात,-४ दृष्टीनें,-५ पराभवित,-६ पिशाचें,-७ मत्-महि-माझीपृथ्वी,-८ आत्मस्तुति,-९ ज्ञानदृष्टीनें,-
१० पहा.

"आयुष्य असे तोंवरि अस्त्रस्मृति मन्मनांत राहेल,-
गुरुशापार्थ असा; मग, कोण मजकडे रणांत पाहेल? २९
"गुरुचा प्रसाद नसता, मज्जीवित निमिषमात्र न रहातें;
उरलीं अद्यापि म्हणुनि निश्चित माझ्या मरेल नर हातें ३०
"न स्वभ्यस्तास्त्राची[1] स्मृति मजला, यावदायु[2], सोडील;
जोडील कीर्ति घाया मज; माझें मन कधीं न मोडील. ३१
"द्रोणाहि, भीष्माहि, राहो; रे, जेहि तुम्हासमीप, राहोत;
पार्थासि मीच वधितों,- मद्विक्रम लोक-पाळ पाहोत." ३२
भीष्म म्हणे,"रे कर्णा, कां स्वाश्रित-धार्तराष्ट्र[3] बुडवाया,
इच्छिसि, दुष्टा! दाटुनि दृष्टिदहनदंदशूक[4]. तुडवाया? ३३
"कृष्णाच्या दृष्टिपुढें जातांचि तुझा पडेल आव रिता;
आम्हां नाचवसी, जरि असता आयुष्य-शेष आचरिता. ३४
"जरि खांडव-दाह श्रुत, तरि तुज कां चित्त नावरे? येतें
विजयाचें, सद्गणनीं जें ये पहिल्याचि नांव रेघेतें. ३५
"या हरिच्या शक्तिपुढें, त्या हरिची काय पामरा शक्ती?-
तेज अजिन-भक्ति-पुढें मिरवील स्कंद-देवता-भक्ती? ३६
"जिंकील देव-सेना निज तेजें सिंहवाह सासूतें?-
शक्तिधरावरि जासी घेउनि तूं इषुसाहसा, सूतें? ३७
"तुजसह होइल भस्म व्यालमुखशरहि[5] धनंजय-शरांनीं;

---

१ आपण अध्ययन केलेल्या अस्त्राची, २ यावद्-आयु-जों आयुष्य तों, ३ धृतराष्ट्रपुत्र, ४ दृष्टीनें दग्ध करणारा सर्प, ५ सर्पमुखबाण.

न तुम्हीं पुरीं मिळविलें, जें तेणें मिळविलें स्रुयश रानीं. ३८
"मारिन ज्यासि म्हणसि, तो, शर्वप्रतिमल्ल, काय नर काचा?
न द्रक्षक तो, केला ज्या प्रभुनें भस्म काय नरकाचा. ३९
"तुजहुनि कोटिगुणाधिक वीरवर्यां जे समर्थ, ते ज्यातें
प्रभुभुज रक्षिति, त्याच्या कैंचि सहासी समर्थ तेज्यातें?" ४०
कर्ण म्हणे; "मज आहे विदित बहुसमर्थ यदुप हा साचा;
महिमा वर्ण्य; -परि बहु प्रेमा भीष्मासि मदुपहासाचा. ४१
"उपहासाचें फळ मी दाखवितों रोकडेंचि अन्यास,
बहु अलंघ्य असे- हा तों म्यां केलाचि शस्त्र-संन्यास. ४२
त्यजिन्री सभा हि, आजिहि, जेव्हां होसील काय-शांत, नवा
समरचमत्कार जनां दाविन मी, वीरराय शांतनवा." ४३
ऐसें वदोनि, मानी तेजस्वी कर्ण जाय गेहाला;
बुध म्हणति मनीं, "कुमते! अधिका तुजहूनि काय, गे, हाला?" ४४
स्मित करुनि सभेंत नदी- तनय म्हणे, "रे, स्रुयोधना, सत्य-
रिपु-गद-नाशार्थ बरे मेळविले हे स्रुयोध नासत्य. ४५
"हा सूतात्मज आधीं वदला कीं, 'मी करीन अंर्यंत;
आतां म्हणतो, 'संगर न करीन मदंत-काळ-पर्यंत!' ४६
"सत्यप्रतिज्ञ लोकीं हाचि! नसे यासमान राजन्य!
सांगा घडेल कैसें यासीं नारायणा, नरा, जन्य! ४७

१ शहरांत, २ महादेवासारिखा मल्ल, ३ देह, ४ मत्-उप-हासाचा, ५ शस्त्रत्याग, ६ युद्ध, ७ हे भीष्मा ८ शत्रुरूप रोग नाशार्थ, ९ अरि- अंत- शत्रुनाश.

"मज्जीवन-क्षयावधि जे स्पष्ट उपेक्षिणार तव नाशा,
ते मित्र काय? त्यांच्या वचनें धरितोसि काय अवनाशा? ४८
"करूनि श्रीगुरु-वंचन, सर्व बुडविलें स्वपुण्य, तप, यानें.—
ऐसें नसतें तरि कां याला घडतीं रणांत अपयानें?" ४९
गांधारि म्हणे,"तज्जय कां त्या आहेत काय, बा, शिंगें?
कीर्ति-धर म्हणुनि विधिनें बांधियलीं त्यांसि काय बासिंगें?
"न तुझा, न द्रोणाचा, न कृपनृपांचाहि भरवंसा धरिला;
दुःशासन-कर्ण-बळें, स्वबळें, म्यां युद्ध-यज्ञ आदरिला. ५१
"मारूनि पांडवांतें, यज्ञ करीन; द्विजांसि तर्पीन;
मणि, कांचन, हय, रथ, गज, गृह, गो, ग्राम, प्रकाम अर्पीन." ५२
विदुर म्हणे,"दमे तारक सुज्ञांसि गमे, खलांसि न दम हित;
दमसम अमृताचाही होईल न सज्जनांसि नद महित. ५३
"जो सोडिला दमें तो पावेल ध्रुवपदा न वेदांतें;
विजयसुखोत्कर्ष बरे अनुभविले बहु सदा नवे दांतें. ५४
"पाश पसरिता झाला गहनांत धरावयासि खग नीच;
दोघे पक्षी, पाशीं गुंतुनि, मरले उडोनि गगनींच ५५
"मग गगनग, खग, देखत, धांवे जो व्याध, त्यास पाहोनी
कोणी तापस, पावुनि आश्चर्य, पुसे समीप बाहोनी. ५६
"व्याध म्हणे, 'मानावा मद्यत्न व्यर्थसा न हा, तातें;
कलहें करितिल गगनग, खग, मग येतील कां न हातातें? ५७

---

१ अवन-आशा- संरक्षणाची आशा, २ पळायनें, ३ बाह्येंद्रियनिग्रह, ४ पूज्य, ५ इंद्रियदमनानें, ६ वनांत.

"सांपडले व्याधाला; घेऊनि पाशासि जे बहु पळाले,
ते कलह करूनि, गुंतुनि, खग गगनींहूनि भूवरि गळाले. ५८

"व्याधा खगसे-काळा सांपडति, करूनि कलि-भ्रांति, ज्ञाती
भूमि न द्याया केली जी काय न ते भलि प्रतिज्ञा ती. ५९

"मेले किरात पाहूनि मधुनें चि, न पाहुनि प्रपातानें;
हे तेंच घातली त्वां स्पष्ट कुसंततिविषेमपणा तातें. ६०

"अंकीं धर्मचि घ्यावा, न शिरीं त्वां दोष हा, कुलीना गा!
अत्यादि सभ्रमू बहु खळां न हरिमूर्ति भाकुळी नागा." ६१

"वृद्ध म्हणे," चत्सा, त्वां गणिला अति हित भ्रांति स्वनाश-पथ्य
हा! ह्यासि वारिता मी निष्फल,-जेविं प्रतिस्वना शपथ. ६२

"संजय, काय धनंजय वदला, वद,- लागला मला आधी;
होते मूर्छित माझी यासंतापें, करूनियां आ, धी." ६३

"अर्जुन, कृष्णामुखानें पाहून, वदला अशाचि वचना कीं,
'मंदासि सांग, रडसिल, आइकुनि अनादृतार्यवचन, नाकीं. ६४

'अन्यायें मेळविलें दे तें, न करूनि बापि हानि धन;
धर्मविभाग न देतां, करिलचि गांडीव-पाणि हा निधन. ६५

'प्राणाग्र परार्थांचीं चित्तांत धरूनि काय, हो, माया?
द्यानं तरि तुमचे शर- दहनीं आलीं चि काय होमाया.'' ६६

न वदे किमपि सुयोधन; बैसुनियां बहुतकाळ, मग राजे
गेले उठोनि तेथुनि ते, सांपडणार काळमारा जे. ६७

१ कुत्सितसंततिरूपविषमोई, २ गव्हाळा, ३ प्रतिशब्दास. ४ अनादर-आर्य-वचन-म नासीत-श्रेष्ठाचेंवचन, ‡ भिल्ल, * नाश.

एकांतीं अंध म्हणे, "इकडे तिकडे असे किती बल हें?
वद, संजया, तयां हे, किंवा ते जिंकितील यां कलहें." ६८
संजय म्हणे, "नृपाळा, प्रायः प्रभु तें समर्थ करिशील;
नसतां विदुर, पितामह, परिसोनि मदुक्त, कोप करिशील. ६९
"केवळ दशमुरव-मतिसचि न कपिवच रुचे, न सर्व लंकेला:
गांधारीहि असावी, मग बोलेन त्यजूनि शंकेला. ७०
"आणवितां एकांतीं गांधारी, विदुर, आणि शांतनव,
व्यास प्रगटे, जैसा राकेचा भव्य काय कांत नव! ७१
व्यास म्हणे, "रे संजय, सांग सुतें जें विचारिलें कांहीं:-
सुर्योधिनि बळें भुलविले हे काळें, जेविं चारिलें कांहीं." ७२
संजय म्हणे; "नृपा, मज तिकडिल इकडिल किती, कसें, बल हें
पुसशी पुनः पुन्हा, यां करवी त्या मारवावया कलहें. ७३
"तरि परिस, पुन्हा कथितों, वीरांनीं अर्जुनाच्युत नमावे
त्यांचें ब्रह्मांडांतहि तेज ब्रह्मेश्वरस्तुत न मावे! ७४
"वधिले ईहिं प्रतियुगीं प्रकटोनि दुर्जन सदानव, सदवना;
यांसि पहाया वाहति सुर, करुनि शिवा सदा नवस, दवना. ७५
"जिंकिल चक्रधराला कवण? तयाचा अगाध महिमा, गा!
कोण स्वालंघ्यत्वें लाजविल दुजा अगोधम हिमागा? ७६
"प्राणापरीस परम- प्रिय पांडव पुंडरीकनयना त्या,

१ मत्तहत्तीच्या स्वभावाचे, २ पौर्णिमेचा, ३ सत्-[illegible]ना-साधूंच्या रक्षणार्थ, ४ दवणा-सुगंधिक लता विशेष, ५ इच्छाला, ६ अग-अधम, ७ हिमाचलास.

हु जपतो तो आश्रित- कल्पद्रुम, विश्वगीतनय, नात्या. ७७
कथितों तुला समासें निकडिल, बहुफार काय बोलून.-
श्वाधिक कृष्ण प्रभु, - कथिलें वेदें मनेंचि तोलून. ७८
ही, सत्य, धर्म, आर्जव, जिकडे,-तिकडेचि कृष्ण जाणावा;
जिकडे प्रभु, तिकडे जय जाय; न लागे स्तवूनि आणावा. ७९
मिष करुनि पांडवांचें, भस्मचि करणार यां तव सुतांतें;
ध्यावें शीलचि, ध्यावें केवळ छाया न घात वसे ज्यातें. ८०
परमाधर्मनिरत तव सुत, केवळ हा न मान्य बालिशता,
दशासुरवशताहि; याला याचीच करील भस्म बालिशता. ८१
"सद्रक्षण, खलमर्दन, नारायणसा न तो नर विसरला; -
सर्वस्व तेज लोकां- माजि विखरितां सदा न रवि सरला." ८२
भूप म्हणे; "मी नेणें, - तुज ईश्वर कृष्ण हें कसें कळलें?"
संजय म्हणे; "मदीय ज्ञान अविद्यामळें नसे मळलें." ८३
राजा म्हणे, "अविद्या, ज्ञानहि, कैसें यथार्थ बोलावें;
त्वद्भाषणें सुतांच्या गुरुनें, असुरांचियाहि, डोलावें." ८४
संजय म्हणे, "अविद्या- मी माझें म्हणसि-हेंचि, गा राया;
विद्या-असें न म्हणणें जें.-हेंचि समर्थ होय ताराया. ८५
"ज्यांचें मन, सच्छ्रुतिमत- पथ सोडुनि, दुष्पथीं कदा न रते,
पावति भगवंताच्या, जाणुनि सद्भक्तिनें, पदा नर ते. ८६
"माझी विद्या आहे, त्वद्विद्या निंद्य गारसी विघरे;

---

१संक्षेपें, २लज्जा, ३द्रव्य. ४मूर्खता ५अज्ञान.

दासालयसम दुर्जन- संगांतुनि झडझडोनि वा निघ रे ८७
अंध म्हणे रे पुत्रा त्यजुनि दुराग्रह यदुइहा नम रे
अमरेश मरे ईशा न विनत जो विनत मर्त्यही न मरे ८८
जा शरण ईश्वरा श्री- कृष्णा वा लोप हट पुरे शम रे
करुनि असाचि दुराग्रह अमरेसहित कनकमयपुरेश मरे
जें त्या श्रीकृष्णाचें चरित मनीं आपल्या पहा रे तें
अशुचिंस्पृष्टा सती म्हणवि भली तापल्या पहारे तें ९०
भूप म्हणे त्या कृष्णा शरणा मरणभयतरोन जाईन
कुयश तरोनी जाइन कीं स्वर्गाप्रति मरोन जाईन ९१
त्या ईश्वरासि जावें शरण अनेकत्र सदय हित राम जो
कृष्ण महेश परि नवा हें सत्य तुम्हां पित्यांसहित समजो
ईश्वर नरिकां तिसऱ्या त्या पांडुसुतासि मात्र कारवेला
वाहे पाहे हेमा- सह तोल्माया बळेंचि लारवेला ९३
अंध म्हणे गांधारी खरकृत जातो बळेंचि नरकास
नरकासह्यबळ यदुप घाली हा तज्जयार्थ नर कास ९४
अंध मनिं म्हणे अंधा सुखलीला दाविल्या पहा रे तें
न कुसंतति तें घावें आलिंगन ताविल्या पहारे तें ९५
देवी म्हणे मजकडे कारुण्य करुनि गाढ वा हेरें

१ मृत्युलोकवासी, २ देवांनीस्तुत, ३ रावण, ४ अपवित्रानेंस्पर्शिलेली, ५ नरकासुराला सहनकरण्यास अशक्य ज्याचें बळ, ६ कृष्ण, ७ पहा.

शोकांध-कूप[1]-पतितां आम्हां अंधांसि काढ बाहेर ९६
जा शरण ईश्वराला दे ज्याचें त्यासि राज्य जोड कर
जोड कर सत्कीर्तीची तूंचि कसा कुरुकुळांत खोडकर ९७
तूं काय भीम मोडिल अमरेवराचीहि[2] तद्दकर मान
या अनया भरणार स्वांसधनें[3] काळभट्ट[4]कर मौन[5] ९८
प्रभु-नमनें सुख शोभा होतां अंगाष्टकांत[6] आठ वण
भीम वधिल तें करिसिल मद्वचनाची मनांत आठवण ९९
व्यास म्हणे धृतराष्ट्रा ज्ञानें या संसृतीसि[7] तरशील
वरशील साधुसंगें जोडावें त्यजुनि-यां इतर शील १००
संजय हित कथिल तुला बहुमत याहूनि न अर्थ दुसरा या
सत्सरा[9] यादं[10] तरसा तूं पाव ब्रम्हा उपाय पुस राया १०१
भूप म्हणे संजय वद हित मज हें दुःख बा पहावेना
पुत्र नव्हे दुर्योधन रिपु जोडा होय पाप हा वेनी[11] १०२
जाणोनि हृषीकेशा जेणें पावेन मुक्तिसि कवीना[12]-
तें सांग कोण सज्जन पुसतां हित-हेतु-युक्ति सिकवीना १०३
संजय म्हणे न जाणें अजितेंद्रिय सर्वथा हृषीकेशा
केविं पिकेल ढका जी लेशहि लागो न दे कृषी[13] केशा १०४
भेदें न हो कुरुक्षय म्हणुनि सदय देवदेव येणार

---

१ शोकरुप अंधार कूपामध्यें पडलेल्यांस, २ देवश्रेष्ठाचीही, ३ स्व-असु-धन-आपल्या प्राणरूप धनानें, ४ काळरूपब्राम्हणहस्त, ५ समज, ६ अष्टांगांत, ७ संसारास, ८ सत्स्वभाव, ९ सत्सर-उत्तमसरोवरास, १० जलजंतु, ११ वेनराजाला, १२ कवि-इन-हे कविराज, १३ शेत.

घेणार जो खलाचें   सर्वस्व प्रभु भल्यास देणार १०५
अंध म्हणे कृष्ण प्रभु   आपण येणार काय गा इकडे
योग्यचि त्या हो वत्स-प्रेमें लंघिति न काय गाइ कडे १०६
ते धन्य भाग्यवंत   प्रभुला अवलोकितात डोळस जे
मी तेविं उशीरासह   घ्याया बहुमान तेविं मोळ साजे १०७
जरि मी केवळ अंध न   गंध नयाचा असे मदाचरणीं[1]
करिल भवबीजरंधन[2]   बंधन-हर गुण वसे सदा चरणीं १०८
प्रभु लोकसंग्रहार्थ   द्रोणा भीष्मा मलाहि वंदील
वंदी लक्षनिगम[3] ज्या   यत्पदरज शंभुचेंहि मंदील १०९
निवविल सत्य-प्रिय-हित-वचनें स्पर्शें मला ससभ्यास
त्या विश्वपालका बहु   आहे सद्रीतिचाचि अभ्यास ११०
मी त्या जगद्गुरुप्रति   गेलों शरण स्मरोनि महिमा गा
म्हणतों राज्येछा तरि   सुत हो त्याचि-प्रभूसि महि मागा १११

# अध्याय ६

धर्म म्हणे श्रीकृष्णा   बुडतों मी सत्य जाण तार मला
भव[4] बुडवी म्हणुनिच तव   भजनीं सनकादिजाणता रमला १

१ मत्-आचरण-माझ्या आचरणीं, २ संसारबीज दहन, ३ वेद, ४ संसार+वाळा

बुडतें कुरु-कुळ भीमा ऽर्जुन-कोप त्यांचि बांचवावे हो
गांवें पांच बहु नको स्थळ पांचां काय पांच वांवेंहो २
भुलला पुत्र-प्रेमें एथें नाहींच संशय शमाया
कथितो वा दारवितो बुडवाया सर्ववंश यश माया ३
जेणें न बुडे कुरुकुळ धर्म यश न्याय त्याचि सहुणाया
सांग सरव्या १यमला हा जन केवळ तूंचि आप्त यदुपा या ४
श्रीकृष्ण म्हणे देवा जानों मी त्यांकडे हित वदाया
काय सुयोधन न शके पचवाया २ब्रह्म-हत्त हि तव दाया ५
धर्म म्हणे हितहि तया अहित अहि तसाचि तो परम खळ गा
व्यसनीं भत्यासि पाडी दुष्ट गजा जेविं पिहित-मुरव खळगा ६
शौरि म्हणे राजेंद्रा यद्यपि बलवान तथापि शृनेकानें
हारिचें काय करावें परिसो तो हित-कथा निशून कानें ७
या खहूतीं अरि जरि भलतेंचि करावयासि पाहेल
राहेल पळ न तो हा खळ-कृत-निज-लंघना न साहेल ८
जिंकिल काय हरा तो जिंकी कुतुकेंचि मन्मथ नरा जा
करिल हरि-मथन शशा तरि करिल सुयोधनहि मन्मथन राजा ९
योजीन युक्ति सामीं सांदीपनिच्या तुझ्या बहु नव्या ही
प्राणापरीस बहु मज जेविं तुम्ही तेविं तो बहु न व्याही १०

१यदुपते कृष्णा, २ ब्रह्म-हत्त- इंद्रही, ३पितृधनाविभागाला, ४ आछादितमुरव, ५ कुत्र्यानें, ६सिंहानें, ७ नीच, ८ हामीकृष्ण, ९ अमर्यादा, १० मदन, ११ कृष्णा गुरुच्या

माय करी बाळाचें नित्य श्रमवूनि काय जेविं हित
तेंवि करितसे मन्मति होय निजदर्येसि काय जें विंहित ११
देइल अंश सुयोधन तरि आम्हां पावला सदाशिव हो
म्हणतोसि तूंहि मीही कीं प्रज्ञाचक्षुचें सदा शिव हो. १२
हो सिद्ध अंश द्याया द्याया स्वप्राण सिद्ध अथवा हो
कथवा हो त्या करवीं यश नाकीं वीर-लोक-पथ वाहो १३
अंश न देइल जरि अरि तरिहि महादेव पावला नवसा
न वसावासि पराक्रम न करीन केवळ अशक्त मानवसा १४
श्रीराम जसा प्रेषी शिकवुनि सामोक्ति अंगदा साच्या
धर्म तसा प्रभु लाजो कार्यी देणार अंग दासाच्या १५
भीम म्हणे केशवजी मृदु बोल उग्र तो सुयोधन हो
बा त्यासीं सख्यचि हो युद्धीं हत एकही सु-योध न हो १६
इतर असो लाजेलचि त्या नित्य मदांध सुरगज गदीशा
दुर्योधना गुरु असें म्हणतिल गरवांध उरग जगदीशा १७
श्रीकृष्ण म्हणे हा रे भीमा जरि तूं महाभुज गदीन
ध्यालासि होय जैसा चिंतुनि गरुडा महाभुजग दीन १८
आम्हां तुझा भरवंसा बहु कीं खळ मर्दिसील तूं अगदीं
निर्वीर्यत्व चिकित्सा समयीं आलें चिराऽर्जिनीं अगदीं १९

१शरीर, २योग्य, ३धृतराष्ट्राचें, ४कल्याण, ५गदाधरपतिला, ६सर्प, ७गदाधरामध्येंमुख्य, ८रोगपरिक्षासमयीं, ९औषधाचेठायीं.

देवी गदा द्रुपदजा अवलंबुनियां[1] भुजाप्रति ज्ञात्या
लज्जेंत बुडाल्या कीं ज्ञाल्या वंध्या तुजा प्रतिज्ञा त्या २०
भीम म्हणे हा घाया सुत-शोक पित्यासि यादवा लाजे
भस्मचि होतील सकळ ते सांपडतील या दवाला[2] जे २१
देवा तुझ्या प्रसादें विजयश्रीकंठरत्नहार[3] गडी
हा काळाचा हरसख कटकें न करूनि यत्न हा रगडी २२
माझ्या या बाहूचें स्मरण करूनि तूं मनीं पहाशील
अथवा रथ-वाजि-द्विप- भट-कोटि प्रशमनीं पहा शील २३
वर्णू काय स्वमुखें स्वपराक्रम वर्णितील सूर साधू
म्हणतील सकळ बळिमद्रा भगवज्जन भीमकीर्तिसुरसा धू २४
यदुनाथ म्हणे भीमा खळ-काळाच्या महाभुजा भावा
तुज निंदिलें न तेंसें वदलों जाणावया तुझ्या भावा २५
अर्जुन म्हणे सख्या जें कीर्तिकर असेल तेंचि कर जा गा
सांगावें काय तुजा प्रणतत्राणीं[4] असेचि करे[5] जागा २६
नकुल म्हणे जगदीशा रक्षाया हा स्वधर्म जें विहित
तेंचि करितां करितसे न विनवितां वृद्धमाय जेंविं हित २७
सहदेव म्हणे देवा दे वात्सल्यें करूनि युद्ध-वर
उत्सव रण-सम कैंचा क्षत्राला[6] हाचि धर्म शब्द वर[7] २८

---

१ आश्रय करून, २ वडवाग्नीला, ३ विजयश्रीच्या कंठांतील रत्नहार, ४ शरणागतांच्या रक्षणीं, ५ ह्रस्व, ६ क्षत्रियांला, ७ श्रेष्ठ.

कृष्णाहि म्हणे कृष्णा म्हणसि जिला प्रियसखा पद्मा हे ती
विसरो तुजी न समयीं ईस श्रितभव्यदा महा हेती २९
बहु गहिंवरोनि दाउनि दुःशासन-पाणि-कृष्ट-केश वदे
बहु दीर्घ उष्ण सोडुनि सुसकारा तीस अभय केशव दे ३०
श्रीमद्युधिष्ठिराच्या दूतत्वा परमलाभ मानुनि घे
दुर्योधन-प्रमुख खल-खद्योत तदन्य-पद्म-भानु निघे ३१
प्रभुला पूजिति निघतां वाल्मीकि वसिष्ठ वामदेवादि
नारदहि जया निज-यश माथां घेऊनि वाम दे वादि ३२
जो जाय दूर पावित सानुज नृप धर्म त्या अपापरता
प्रभुवर म्हणे रहा या कार्याच्या सिद्धिला जपा परता ३३
धर्म म्हणे शीघ्र सुखें ये जोडुनि सिद्धि कीर्तिसह देवा
मातेसि नमुनि वद कीं आहे आरोग्य साधु सहदेवा ३४
तूंजेविं देवकीला भेटसि तेसाचि भेट आतेला
आम्हाहुनि तूंचि अधिक घृत सोडुनि कोण करिल आ तेला
स्वपदभ्रष्टसुतांचा भाजितसे तीस नित्य नव्याधी
व्याकुळ करी जसा हा तेसा शूलज्वरादि न व्याधी ३६
कृष्णा कळेल तेसें वद कुंतीला न दुःख बाधावें
पंकीं धेनु भ्रमती पुण्यश्लोका मुरारि वा धांवें ३७

१ आश्रित-भव्य-दा-आश्रित हितकर्त्री. २ नलवार, ३ दुःशासनाच्याहस्तानेंआकर्षित केश, ४ दुर्योधनादिकांहूनअन्यजे पांडवादि कमलरूपत्यांविषयींसूर्य, कृष्ण, ५ निष्पाप न्याय्यीं रतजो त्यास, ६ नव्य-आधि-नूतनमनोव्यथा, ७ चिखलांत.

धृतराष्ट्र भीष्म बाल्हिक विदुर कृप द्रोण सर्व शुचि तज्ज्ञ[1]
जे त्यांसि भेट वद हित सांगों तुज काय तूंचि उचितज्ञ ३८
त्यां पुसिलें कुशल असें कर्णासि सुयोधनासि सांगावें
येतां पंचम[2] टाकुनि कर्ण-कटु पिकें शिकोनि कां गावें ३९
ऐसें अजातरिपु नृप सूचित[3] सुचवूनि शौरिला परतें
मग विजय म्हणे देवा येवूं द्यावे न मजपुढें पर ते ४०
कर जोडिले तुज पहा साम घडो राहवीन कोदंड
आर्या भीमापासुनि अंधसुता आंहची[4] नको दंड ४१
खल-बल-मथनोत्साहें भीमें गर्जोनि लोक कांपविला
खचले खेचर[5] मग न म्हणतिल तह्रा हु तोकें[6] कां पविला[7] ४२
प्रभु पांडवांसि फिरवुनि जातां पाहे पथांत नाकर्षी[8]
राजर्षि ब्रम्हर्षि स्वयश जयांच्या मनासि आकर्षी ४३
उतरोनि रथाखालीं साधूंचे वंदिले अनेक थवे
प्रभुनें दिलें तयां सुख मुख-लसें करुनिही न तें कथवे ४४
इच्छा पुसतां वदले या तुजसम अन्य बोलका नाहीं
पाहूं धृतराष्ट्र सभे-माजि तुझे धन्य-बोल कानांहीं ४५
दे या अयोस[9] यांया[10] आज्ञा सदया महोदया परिसा
यापरि साधुमनोरथ जाणोनि म्हणे मुकुंद या परिसा ४६

---

१तत्वज्ञाते, २पंचमस्वर, ३सु-उचित, ४सुरूप, ५आकाशसर्वोपर्वत, ६लहान, ७वज्राला, ८नाक-ऋषि-देवर्षि, ९लोहास, १०यावया.

सामार्थ प्रभु येतो ऐसें धृतराष्ट्र आयके कानीं
बहु तृषित अंध-चातक मेघागम जेविं काय केकानीं ४७
मार्गी सभादि सर्वहि बहु साहित्य प्रतिस्थळीं करवी
कीं आपणावरि दया-दृष्टि कृष्णवी यदूत्तमें वरवी ४८
देव न पाहे तिकडे कीं तें करणें नव्हेचि निष्कपट
भेटीचे स्वीकारिल कवण विचक्षण अमूल्य निष्कपट ४९
तें सर्व डावलूनि प्रभु गेला गजपुरासि परभारा
हांचि भल्याचा आम स्वशिरीं घेईल कोण परभारा ५०



## अध्याय ७

धृतराष्ट्र म्हणे विदुरा जो साधुमनें स्वसद्गुणें हरितो
येईल वृकस्थळाहुनि आम्हां भेटावया उद्यां हरि तो १
दासी शत दास हि शत आठ महानाग रुक्मरथ सोळा
देईन तोहि सन्मणि रुचिनें ज्याचा चि जो गमे गोळा २
जे मनुयोजन ग्रामीं स्वस्वानें श्रीडदान दे वाघा
माझ्या आज्ञेनें तें अश्वतरीयुक्त यान देवा घ्या ३
सद्भूषणं रुकवस्त्रें पुष्कळ येतां चि हरिस अर्पावी

---

१ मेघ-आगम-मेघांचें येणें, २ यावया, ३ व्याधाचे, ४ रुवर्णखचित वस्त्र, ५ परकी पभाराला, ६ रुवर्णरथ, ७ चवदाथोजनें-छपन्नकोश, ८ स्वशब्दाने, ९ लज्जादान, १० वाहन. * त्यागकरुन.

सैन्यें सदन्नपानें बहु बहुमानें करूनि तर्पावीं[1] ४
दुःशासन-मंदिर द्या उतराया माधवासि पौरव हो
स्वाभासि[2] प्राप्त तुम्हां- पासूनि बहु-परम-पूर्ण गौरव हो ५.
विदुर म्हणे कपट मनीं प्रेम वरि असें करूं[3] नको पावें
तुजवरि न ईश्वरानें करुणा परती करून कोपावें ६
सर्वस्व प्रभुचरणीं अर्पिति बुध होउनी गेचि तराया
देणार हें किति क्षिति दे या पृजेसि तो उचित राया ७
पांचां पुत्रां द्यावीं पांच न होउनि खळासि वश गावें
तें तूं न करिसि जेणें प्रभुनें स्वमुखें करूनि यश गावें ८
गुळखोबरें विलोकुनि भलत्या हि जनासि बाळक वळावा
सत्य प्रेम चि दाउनि मुझें तो विश्वपाळ कवळावा ९.
कपटा-दरें[4] वळो पर परि परमेश्वर कसा वळेल हरी
कृष्ण-कृपा-मृत-निधिची[5] अकपट-विनताकडे[6] वळे लहरी १०
येतो साम कराया होय यशोर्थी च तो यशा लाहो
देणार तुम्ही हय गज रथ दासी दास हे कशाला हो ११
समजाल तरि करिल हरि हर्षे पावोनियां क्रिडा[7] लास्य.
नाहीं तरि खेद[8] दत्या सर्व जसें प्रस्थिना बिडालास्य[9] १२
प्राण हि सोडिल परि हरि पांडवसख्य न पळार्ध सोडील
कृष्ण-प्रीति न मोडिल पटु[10] कोणही अम्हालिपि हि खोडील १३

१ तृप्त करावीं, २ स्व-आभास- आपुला आप्त कृष्ण, ३ क्रुद्ध, ४ कपट-आदर- कपटयुक्त आदरानें. ५ कृष्ण कृपा- रूप अमृतसागराची. ६ निष्कपट नम्र, ७ नृत्य. ८ खेद देणारें; ९ बिडाल- आस्य- मार्जाराचें मुख. १० चतुर, ११ प्रयाण करणाराला.

तेव्हां सुयोधन म्हणे सत्य न सोडील सख्य हरि यांचें
न पुरेल कृष्ण-मानस- हरणीं बळ मेरुच्या हि हरित्याचें १४
कृष्णासि वस्तु संप्रति किमपि न द्यावें तुम्ही अहो तात
घ्याल म्हणेल मान्य न अवमानाला कुलीन होतात १५
त्रिभुवन[1]-पूज्यतमप्रभु सत्य चि हें किंच[2] तो असे त्याही
परि संप्रति सेव्य नव्हे सेवूं कृष्णेतरा असेव्याही[3] १६
जें वैर वाढलें तें आतिथ्यें करुनि काय हो शमतें
अवमान नव्हे जेणें तें सर्वोचित असें मला गमतें १७
भीष्म म्हणे रे पुत्रा धृतराष्ट्रा ईश्वरप्रभावज्ञा[4]
जीवपतंगा योग्या न प्रभु-दीपा-र्हणा[5] प्रभा-वज्ञा १८
मधुर वदा प्रियचि करा प्रभु पूजा परमशुद्धभावानें
तत्प्रिय हें कीं भावां- सहन करावें चि युद्ध भावानें
तों दुर्योधन बोले ताता मज हें चि युक्त भासतसे
अन्नाछादन देउनि पाळावे पांडुपुत्र दास तसे २०
उडतात शत्रु ज्याच्या सामर्थ्यें[6] त्यासि आकळायाचा
योगें उपांचि असे हा मंत्र[7] नव्हे केशवा कळायाचा २१
बलि-विवर[8]-वसति जसि तसि चिर अनुभवु कृष्ण एकला खोली
वाहो शिवा शिवांची स्तुतिची मज नित्य एक लाखोली २२
धृतराष्ट्र म्हणे पुत्रा न वद असें कृष्णसोयरा ज्याला

---

१ त्रिलोकामध्यें पूजेला अतियोग्य, २ आणि, ३ सेवेला अयोग्य, ४ ईश्वरशक्तिज्ञात्या. ५ दीपज्योतीची अमर्यादा, ६ बांधायाचा. ७ मसलत, ८ बलिदैत्याला पाताळीं जें शीवसती.

पूजावें त्या बंधन हें कर्म अयोग्य होय राजाला २३
बंधार्ह[1] नव्हे आला सामार्थ्य वरूनि दूतपण साचें.
बाहेरि गमे नीरस परि अंतर मधुर पूत पणसाचें २४
भीष्म म्हणे दुर्मोचन परिसावें काय यापरी तातें
भजसी भस्म कराया शोकीं कुळकाय या परीतातें[2] २५
प्रभुच्या किंजेल येणें भंग विपतिचा[3] न कां नवा टोळें
हा हा हा ऐसा खळ कुयशाचें करिल कां न वाटोळें २६
हरसा हरि प्रतापी हा होय स्पष्ट दुष्ट अंधकसा[4]
कुकृत हि अमृतरस चि नरि सेवुनि तूं अंतरीं हि अंध कसा २७
तुटतो यन्नामें भव- बंध तया हा करील बंध कसा
सभ्यें सोडावा चि स्व-पर[5]-विकृति-कर कुसंग गंधकसा २८
न लभे भगवदवज्ञा- फळ ऐसें कळकळोनि आयकवी
परि न वळे म्हणुनि निघे तेथूनि खळासि करिल काय कवी २९
वृष्णिप[6] वृकस्थलाहुनि येतां भीष्मादि सूज्ञ ते सर्व
जन सामोरे गेले अंदुक[7] झाला सुयोधना गर्व ३०
धरिलें असतें जरि तें कृष्णा-[8]बरकर्षणादि आग[9] मनीं
आगम-निगम-नुत[10] प्रभु आदर करिता कशास आगमनीं ३१
दिन[11] धन्य धन्य ऐसें प्रभुला पाहोनि सर्व पौर वदे
सर्वांसि योगि-दुर्लभ- दर्शन तारावयासि पौरव दे ३२

---

१ बंध-अर्ह-बंधनास योग्य, २ मृतातें, ३ पक्षिपतिगरुड, ४ अंधकासुर, ५ आपणाला आणि अन्याला विकारकरणारा, ६ यदुपतिकृष्ण, ७ शृंखला, ८ द्रौपदीचें वस्त्रकर्षण इत्यादि. ९ अपराध, १० वेदशास्त्रानीं स्तुत्य, ११ दिवस.

धृतराष्ट्र गृहा नेती राजपथीं हळुहळू च हरि हरितें
त्यां पक्ष म्हणेल तो पक्ष त्यांचें सरूपत्व अतुल हरिहरि तें ३३
भेटे धृतराष्ट्राला तत्कृतपूजेसि बहुत भावुनि घे
मग जगदीश्वर तेथुनि त्याचा निववावयासि भावु निघे ३४
हरि न म्हणतां रथीतें ही होती वाणि देवि दुरधीतें
ऐसें म्हणोनी तें सुख भेटुनि अरिपाणि दे विदुर-धीतें ३५
विदुर म्हणे अमृतकरा निववूं आलासि या चकोराला
मुक्त्यर्पितमालाश्री देत्ये त्वद्दास्य-याचकोराला ३६
त्वद्दर्शनें सुख विभो झालें जें काय मी कथूं तुज तें
बा यावरीच टकला घालूनि ज्ञानिचित्त ही सुजतें ३७
सुरभीच्या कासेसि न सुज्ञें होवूनि वत्स लागावें
तुझिया चि दास होवुनि लागावें तुजचि वत्सला गावें ३८
आहेत सुखी पांडव देवा आलासि काय सामास
खळ न बळेल झिजविला जरि करितां बोध काय सामांस ३९
सर्वज्ञा जगदीशा! देवा आलासि काय सामास
सामास हंस मौक्तिक वर्णूं प्रिय फार वायसा मास ४०
तव अवमान करावा ऐसें याच्या असे मनीं कांहीं
परि होसि प्रेमानीं बद्ध न दुष्टाचिया अनीकांहीं ४१
भीष्म-द्रोण-व्यास- प्रभृति सकळ भागले महाभाग

१अश्व, २बंधु-विदुर, ३चक्रपाणि,कृष्ण, ४हे चंद्रा, ५मुक्तीनें अर्पण केलेली माला-श्री-शोभा देणें, ६त्वत्-दास्य-याचक-उर तुझें दास्य याचकांच्या उराला, ७कामधेनूच्या ८स्तनास, ९शरीर, १०साहा महिने, ११सेनाहीं, १२प्रमुख. ४ विदुरधीचें विशेषण.

विश्वगुरो करुणाब्धे तूं हि खळा कथुनि हित पहा भाग ५२
विदुरासि भेटल्यावरि भेटे सर्वांसराजकुंतीतें
जीस असुख सह्य गमे दे जें भेदूनि हृदय कुंतीनें ५३
वैकुंठाच्या कंठीं घालूनि मिठी रडे पृथा आर्या
ब्रम्हास हि गाहिवरची महिवर वीरेंद्रपांडुची भार्या ५४
प्रभुला म्हणे मुकुंदा या तूं करिसी सुखी सर्वदास
संप्रति आहेत कसे मद्बालक ते तुझे सर्व दास ५५
म्हणती नृपर्षि पुण्य- श्लोक कवि शरण्य या स्मरा ज्याला
आहे कैसा झाला ज्या प्राप्त अरण्यवास राजाला ५६
खलमळजल्लबळ विश्रुत- वीर्य वृकोदर कसा असे आंजी
आ जीवना प्रसरित्ये विकळा अभिमन्युची जया आजी ५७
ज्याचा प्रताप-पावक खळ-दिति-दनु-तनुज-बळ-प्रवेस खातो
आहे कसा कसा जो पुररिपुंच्या उतरला नव सखा तो ५८
जे म्हणति स्वर्गाला गेली कुंती च माय हे माद्री
आहेत कीं सुखी ते वत्स गुणांमध्ये निकाय हेमाद्री ५९
प्रियसुतविरह सुदुःसह देहविरह बहु बरा सुसह देवा
पावेन मी कधीं बा म्हणतें स्वबहिश्चरासु-सहदेवा ५०
वत्सा सहदेवा मी भेत्यात्वां हाय न च वदावें हो
तेरा पळें हि नसती माता हें हायेंन चवदावें हो ५१

१ भाला-शस्त्रधारी. २ कृष्णाच्या, ३ स्वेदयुक्तास, ४ आज. ५ दुष्ट दैत्य-दानव-बळरूप तृण, ६ कुसोटीस. ७ पुर राक्षसाचा शत्रु-शिवाचा, ८ गुणरूपंक्तांचं गृह, ९ माझ्या बाहेर फिरणाऱ्या प्राणरूप सहदेवास, १० वर्ष.

श्रीकृष्णा[1] श्रीकृष्णा कैसी आहे असें मज न पुसवे
कीं तीच्या कुसख्यानें लाजविले स्पष्ट आमुचे कुसवे ५२
ते काय रक्षिती त्या व्यसनीं पांच हि न एकलीला जे
बहु लाजल्या कृतवती तीस न हे मात्र एकली लाजे ५३
तूं नाथ रमानाथ प्रद्युम्नं हि नाथ सत्य हें नातें
असतां एथा रडावी व्हावें धड एक सत्य हें ना तें ५४
बहु येतें तेज म्हणुनि तुझिया रमतात विप्र भजनातें
खल-हृत-सर्वस्व तुझे सेवक गमतात विप्रेभ जनातें ५५
मृत्युंजयाश्रितांच्या[4] प्राणांहीं बा कसा रमे यम रे
दैव तुजपुढें प्रभु हें चित्र हरिपुढें न सारमेय[5] मरे ५६
प्रभु अम्बु पुसोनि म्हणे जें संकल्पित घडेल सत्वर तें
आत्याबाई कवणें ऐसे श्रम भोगिले न सत्व-रतें ५७
मच्चित्त कौरवांचे चिंतूनि असाधुवाद तळमळतें
असतों मी तें तरि न व्यसन-मळें धर्म-पाद-तळ मळतें ५८
आहेत त्वत्सुत ते पुण्यश्लोका वृथा करूं र सहाय
होइल कीर्ति म्हणेल त्रिदशाऽनाहत करुधा करस हाय ५९
आहेत सदार करवी देवि नमस्कार हे तुला साजे
ऐसें सांगुनि वंदी तें त्या प्रितशर्म हे तुला साजे ६०
समजावुनि कुंतीतें भेटे दुर्योधना असें[7] व्या ही

१ द्रौपदी, २ पुत्र, ३ निस्तेज, ४ शंकराश्रितांच्या ५ कुत्रा, ६ आश्रितांच्या करवा ला कारण ऐश्वास, ७ सेवकवयास अयोग्य ऐश्वासही.

कीं तो स्वसुता स्वसुता देवुनियां जाहला असे व्याही ६१
लघु म्हणति जे सुयोधन दुःशासन शकुनि कर्ण वेनातें
परिरंभ-पात्र केले प्रभुचें सौजन्य वर्णवेना तें ६२
पूजुनि घे प्रभु होइल जलनिधिला तृप्ति-दायक विहीर
थोरपण अनंताचें अनंत वर्णील काय कविहीर ६३
भोजन करा म्हणे शठ देव म्हणे मज कशास हो करिता
जेवा तुम्ही च दावुनि आदर आग्रह कशास हो करिता ६४
असतों जरि अन्नार्थी प्रथम चि म्हणतों अवश्य मी तुजला
प्रेमार्थी पांडवसख हा अन्नाकारणें नसे सुजला ६५
प्रभुला म्हणे सुयोधन तिकडे इकडे हि सम असे नातें.
ज्या कारणें कराया अस्मदनादर तुवां असेना तें ६६
देव म्हणे केवळ ते न सोयरे मदसु सर्व वसु देव
मान्य जसे अक्रूरो- द्धव बळभद्रा ग्रसेन वसुदेव ६७
जे तत्सख तद्रिपु ते मत्सख मद्रिपु खरे अगा राया
द्विषदन्न न सेवावें म्यां येऊं ही नये अगारा या ६८
हें काय बरें खळ हो साधु तुम्ही सर्वकाळ जाचावे.
सदरि असह्य मज असा अहि हि न जो सर्वकाळ जाचावे
खोटा सुयोधन म्हणुनि विदुरगृहा जाय देव न च खोटा
गोपोच्छिष्टा वळला वळला कां वासुदेव न चखोटा ७

१ वेनराजानें, २ आलिंगनालापात्र, ३ सुजनत्व, ४ कविश्रेष्ठ. ५ वर्णाविता, ६ मत्-असु-माझे प्राण, ७ द्रव्य. ८ द्विषत्-अन्न-शत्रूचें अन्न. ९ गृहास. १० सत्-अरि-साधूंचा शत्रू, ११ सर्प. १२ गोप-उच्छिष्ट, १३ चांगल्यास.

तैसी ही तरली जी स्तन्य[+]मिषें दे[1] वैकी स्कृतापचि ती
ऐवी कथा परि घडे न खवाला देवकीस्कृतापचिती[2] ७१
द्रोण कृप भीष्म बाह्लिक सर्वस्व निवेदुनी परि न परते
खळसंसर्गे प्रभुच्या अंतरले पूजना जरि न परते ७२
प्रभु त्यांसि म्हणे केली मदपचिति[3] तुम्ही गृहासि जा च कसे
चित्त प्रसन्न नसतां उपचाराग्रह नव्हेत जाचकसे ७३
दुःसंग-नक्र-दत्त- क्लेश[4] निवारूनि सर्व विदुर-गजा
मुक्तकरी हरि ला जे गातां गुणकीर्ति सर्वविदुरग[5] ज्या ७४
विदुरप्रेमें जेवि ब्रह्मादि कवि प्रसन्न यज्ज्ञानें
प्रभु ला तेविं न करिति व्यासादिक विप्रसन्न यज्ञानें[6] ७५
शत-संख्य राजवी ज्या जेवविता माय-देवकी चिटक्या
तो नित्यतृप्त भगवान् विदुर-गृहीं भोजनांत दे मिटक्या ७६
आले ठेंकर दिधल्या मिटक्या बहुसाल मारिले भुरके
उरके सर्वो मागुनि - अज्ञांन परि न ताट-चाटणें उरके ७७
ज्याच्या चरणें स्वरजा- करवीं प्रणतांसि मोक्ष देवविला
देव विलास-मनुर्ज-तनु विदुरप्रेमें यथेष्ट जेवविला[7] ७८
मग रात्रौ एकांतीं सर्वज्ञाला हि साधुराय कवी
पाय रगडितां दुर्जन- दुर्योधन-दुर्मनास आयकवी ७९
खळ-मंडल-प्रवेश प्रभुचा हि मला प्रशस्त भासेना

१ पूतना, २ देवकी-कृत-अपचिति- कृष्णाची पूजा, ३ मत्-अपचिति, ४ दुःसंगरूपनक्रानें दिलेला क्लेश, ५ सर्ववित्-उरग-सर्वज्ञशेष, ६ यत्-ज्ञान-ज्याच्या ज्ञानानें, ७ भोजन. ८ लीलेसाठीं मानुषदेही. + दुग्धपानाच्या निमित्यानें.

बहुत मिळाल्या असती शत्रूंच्या दुःसहप्रभा[1] सेना ८०
भासति पांडव जैसे तैसा मज तूं हि वत्सा स्नेहें
अनुकारितसे सतत सकंपत्वें हृदय वत्ससास्ने हें ८१
देव म्हणे वांछिसि हित वांछावें जेविं मायबापांनीं
जें शिव सदुक्तिपानीं तें अमृताच्या हि काय बा पानीं ८२
सुख यश नसे विरोधीं सुमति[6] रमति सुखयशोजनक[7]-सामीं
आलों करावया उप- देश उपेक्षूं सुहृज्जन कसा मीं ८३
कळतील तरि अपयशें यां सर्वांचीं मुखें न मळतील
चळतील नीति-मार्गीं धर्मक्षोभानळांत[8] जळतील ८४
म्हणतां सुहृदुत्तम मज मग त्यां समयीं करें न राखावें
विदुरा वाइट वाटे कुलजाहि असदृशें नरा खावें ८५
बहु-काम-कोप-लोभां उग्रां अरुणं समस्त सुर भीती
हे व्याघ्र चि बा विदुरा जी कीर्ति स्पष्ट होय सुरभी[9] ती ८६
पंगुहि मेरुवरुनिहि न माथां धरितां यदंघ्रिरज निसरे
त्या दीनबंधुची ती चिंता नसरे परंतु रजनि सरे ८७
प्रातःकाळीं सशकुनि दुर्योधन ये स्वयें बहायाला
प्रातर्विधि करुनि प्रभु जाय प्रज्ञाचक्षका[10] पहायाला ८८
स्वस्वीकृति[11] करितां शुचि- यश फोडिल कां न हांक विदुरापें
कीं त्यासि घे रथीं तो यच्चरणरजें महाकोविदुरापें[12] ८९

१ असह्य तेज ज्यांचें ऐशा, २ समान होत असे, ३ वासराच्या गळ्याखालचे हालणारें कांबळेला, ४ साधूंच्या भाषणाच्या प्राशनांत, ५ प्राशनांत, ६ उत्तममति ज्यांची, ७ सुख-यश-उत्पन्नकरणाच्या, ८ धर्मराजाच्या क्षोभरूप अग्नींत, ९ कामधेनू, १० धृतराष्ट्राला, ११ आपला स्वीकार, १२ ज्ञात्यांस ही दुष्प्राप.

जनदृष्टि चातकी जी तूर्य[1]रवें करूनि देत ओ तीतें
प्रभुमेघ दर्शनामृत दुर्लभ जें तन्मुखांत ओती तें ११०
ज्याच्या दयातरीनें स्व-मनोरथ-सागरांत सुरभि[2] तरे
केले धीट जयाच्या स्मृतिकवचें वासवादि-सुर[2] भितरे १११
जो पर[+]महित परम हित परमहि तरि कर्णधार यदु[4]पकृती
बहुजीवांवरि पावे तो त्या कौरवसभेसि यदुप कृती ११२
जातां चि सभेंत न भी देवर्षि-प्रमुख-देखिले विप्र
प्रभुनें सत्कारविले भीष्माकरवीं महामुनी क्षिप्र[5] ११३
भीष्में धावोनि पुढें जाउनि अत्यादरें पदीं नमुनी
पूजूनि वरासनीं बहु तोषविले ते दया-नदीन[6] मुनी ११४
मग जी जलदश्यामा[7] करुणा बसली नवासनावरि[8] ती
जीच्या उपासकजना प्रति विषयाच्या न वासना वरिती ११५
केवळ जवळ बसविला विदुर प्रेमें करूनि मोपानें
नघश न मोजवेल ब्रम्हांडा-येवढ्याहि मापानें ११६
झाले प्राप्त कुरुसभे- मध्यें त्या दुर्लभा अवसरा[10] जे
आले ज्ञात जन्म करित ते श्रीगोरीश्वरा[9] नयस राजे ११७
टकमक पाहत होते प्रभु-मुख-चंद्राकडे चि चातकसे
नसतील जोडिले श्रव- णांहि वसाया मनासि हान कसे ११८
सभ्य[11]श्रुति वदनानें परिसति सेवावया भगवदुक्ती

---

१कामधेनु, २इंद्रादि, ३नावाडी, ४यत्-उपकृति-ज्याचाउपकार, ५तात्काल-अत्यंत
६दयासागर, ७मेघश्याम, ८नव्या आसनावरि, ९लक्ष्मीपतीनें, १०समय, ११सभ्यांचे क
र्ण, + श्रेष्ठांनीपूजित, ∗∗ कुशल.

प्राज्ञावयासि जेविं स्वच्छस्वात्यंबुला+ जलधिशुक्ती[१] ११



## अध्याय ८

देव म्हणे धृतराष्ट्रा राया मोठी जगीं तुझी पदवी
पद विद्यांचें तूं परि परिस मज बळेंचि आमता वदवी १
श्रुत-वृत्तादि-सुगुण-गण- मंडित-कुळ-सन्नृपांत हे महित
जे झाले त्यांन तयां गमलें बहु यशचि हित न हेम हित २
जें मेळविलें चंदन- सम झिजवुनि परसुखार्थ आंगातें
केवळ कृपाळु पूर्वज सयश मळविसि बळेंचि कां गा तें ३
आल्हाद तुम्हां होतो चदिलां परदुःखदर्शनें त्रास
तूं दाविसि अनुकंपा न शशिकळा जेविं दर्शी[२] नेत्रास ४
कौरव करीत आले बहुयत्न परासुखप्रहाणातें[३]
ऐसें कारुण्य-कुल- व्रत सोडिल कोण गा शहाणा तें ५
दुःख परासि न द्यावें सत्य वदावें क्षमा न सोडावी
जोडावी कीर्ति असी कुल-रीति तुम्हीं कधीं न मोडावी ६
केले गुप्त प्रकट व्यवहार अनर्थ-हेतु तनयानें
ते कां न वारिले त्वां केसें होईल कुशल अनयानें ७
जी वेश्या बुध वारिल त्यजुनि अमर्यादरा[४] जनीं तीतें

१ समुद्रांतील शिंपले, २ अमावास्या, ३ परांचें असुख म्हणजे दुःख त्याचें प्रहाण म्हणजे नाश त्याविषयीं. ४ अमरी-आदर-देवांगनेचा आदर, + स्वातीच्या उदकाला.

१भजतो अनीतितें हा त्यजुनि अमर्याद राज-नीतीतें ८
मुख्य स्वबंधु पांडव तन्नाशानेंचि हे अकवि टपती
विश्वस्तामीनातें परदारातें जसे बक विट-पती ९
त्वन्नंदन-दुर्मति हे क्षिति बुडवायासि नापदा ओली
काळाच्या क्रीडेची तुझियासदनांत आपदा आली १०
या व्यसनातें चिंतुनि मन कुदशोला भिऊनि हळहळतें
शमवावें त्वां प्रभुनें जेविं शमविलें पिऊनि हळहळ तें ११
स्वसुतांसि शमीव नृपा स्वसखव्यासह शमविजेल भीमहि त्यां
पुत्रा अजातरिपुच्या तूं साक्षाद्गुरुहि तरिहि भी महिम्या १२
पांडव करूत तुजला त्यांही सिंहासि हे ससे नमनें
देतील मस्करीं स्व प्राणासह जरिहि ते सेसेन मनें १३
तूं प्रभु सुयोधनादिक हे पुत्र तुझ्या करीं असावे च
अन्यरणीं प्राणांच्या योग्य परि न योग्य हा असा वेचे १४
वादिय धर्म प्रेमें वाढवि मज जेविं नंद नवनीतें
सत्पुत्रांनीं भवनीं सुर-तरुनीं न सुख नंदन-वनी तें १५
त्यजिले इष्टद पांडव कां उन्मूलन करूनि सुरतरू से
वा उर्वशीच एकीं पार्थीं न पवोनि एक सुरत रुसे १६
पांडव सहाय असतां तुज होतिल सर्व लोक वश्य पहा
त्वद्भाग्योत्कर्षातें श्रवण करुनियां म्हणेल कश्यप हा १७

---

१ सखी, २ प्रभुनें त्वां आणि प्रभुनें शिवानें, ३ विष, ४ अर्जुनासह, ५ सेनेसहित, ६ खर्च ७ न पावून.

म्हणतो युधिष्ठिर नको पायें लोटूं मला अवनेतातें[1]
वचनकेशपत्याचें[2] न करावें काय हो अवेन नातें १८

क्रमिले तसेंचि कथिले होते त्वां त्यासि अब्द तेरा जे
धन्य म्हणत होते जे लावितिल तुला चि शब्द ते गजे १९

सुखसंतति सुकृतार्थि[4] प्रीति श्री पुण्य कीर्ति या लोभें
साम करीं साधूंसीं नाहीं तरि पावलेंचि यां लोभें २०

बहु-सत्य बहु-प्रिय बहु- हित बहु-मत बहु-दुराप बहु-रुचिर
शुचि रम्य क्षीरधिजा- ननचंद्रचकोर बोलिला सुचिर २१

त्या बोधामृतपानें निवुनि म्हणति सभ्य वर्णे[10] हे व्यास
सुरगुरुहि म्हणे रसने या सद्रिपुंच्याहि[11] वर्ण हे व्यास २२

मग भृगुराम म्हणे हे दुर्योधन भूमिपाळ सत्य जुनी
कथितों समयोचित हित- हेतु कथा परिस आळस त्यजुनी

होता अत्युद्दाम[12] क्षितिपति दंभोद्भवाख्य[13] पर्वतसा
त्याच्या हृदयांत जसा नव्हता कोणाचिया हि गर्व तसा २४

नित्य मुनीस पुसे कीं मजसीं संगर करी असा मान्य
कोण्ही असेल जरि तरि- सांगा लोकांत जो असामान्य २५

ते कंटाळुनि म्हणती काय उणें बहु समर्थ आहेत
जा गंधमादनीं नर- नारायण पुरवितील हा हेत २६

---

१ अतिनम्रानें, २ आशंकितबालकानें, ३ रक्षण, ४ सुकृत्-ऋद्धि, ५ याळाभास्तव, ६ सुखादिकांला, ७ भय, ८ क्षीरधिजा-आनन-चंद्र-चकोर- लक्ष्मीच्या मुखचंद्राचा चकोर कृष्ण, ९ फार वेळपर्यंत, १० वर्णन कर, ११ सत्-रिपु-साधुद्वेष्यांच्या, १२ अति-उद्दाम- फार माजलेला-फार गर्विष्ठ, १३ दंभोद्भव- आख्य- दंभोद्भवनांवाचा.

सेना घेउनि गेला दंभोद्भव गंधमादनाऽगातें[1]
सिद्धाश्रमासि पावे विश्व जया सिद्धि[2]सोदना गातें २७
जातांचि भेटले त्या- प्रभुबहु[3]दुर्लभ तपोनिधी राजे
ज्यांला चिंतुनि तरले बहु भरतादिक- तपोनिधी राजे २८
पाहुनि मृशा-कृश तो नृप हांसे हृदयांत फार अवमानी
परमार्थ न कळतां कां हासावें न पर[4]मांसि अव[5]मानीं २९
पूजुनि नरनारायण म्हणति मनें इछिलें कळिव राजा
द्यावें सर्व सुर-नगें समभि[6]लषित काय जें अलि[7]वरा ज्या ३०
ऐकुनि यश समरार्थी मी आलोंहें[8] असें म्हणे मल्लधी
खळ धीट-पण प्रकटी तें पाहुनि हासले दया-जलधी ३१
स्मित करुनि प्रभु वदले पशुहि न या आश्रमांत उद्धत रे
येथें असंग-शस्त्रें कवि षड्रीपुतें चि करुनि उद्धत रे ३२
हासति मुनि त्या मंदें- समरचि वरितां पुन्हा तपोराशी
म्हणति मनांत न खेळों- द्यावें या या उन्हांत पोराशी ३३
मूढात्याग्रह[9] पाहुनि जो नर-मुनि साध्वसाधुभावज्ञ[10]
धरि मुष्टिभरि इषीका[11] सकरुण सस्मित सलील सावज्ञ[12] ३४
दंभोद्भवाप्रति म्हणे नारायणसख बुधा न वर समर
टाकुनि मरसि जरि गरळ रस गिळुनि वमुनि सुधानवरस मर ३५
हूं ऊठ तुझी युद्ध- श्रद्धा हरितों वहा सहायानें

---

१पर्वतातें, २ सिद्धीच्या आगृहास, ३अत्यंत, ४उत्तमांसि, ५नीचानीं, ६इछित, ७भृंगश्रेष्ठा, ८आलोंआहें, ९मूढ-अति-आग्रह, १० साधु-असाधु-भाव-ज्ञ-चांगलावाईट भाव जाणणारा. ११तृणें. १२अवज्ञायुक्त.

ब्रास्त्र कशास तुज बहुत मुष्टि-इषीका पहा सहा यानें ३६
भूप म्हणे उठलों परि उचित इषीकास्त्र मज नव्हे राया
धर्मज्ञा तूं हि नससि योग्य अशाला मला अव्हेराया ३७
शस्त्रास्त्रांचें दावी तो नृप बहुधा तयास कटक-बळ
कांडांचाहि न ज्याच्या तेजा बहु धातया-सकट कवेळ ३८
नरमुनिवर सोडियला भूपें शस्त्रौघ जो निशात रणीं
त्यासि इषीकांनींच च्छेदी रिपुवाहिनी-निशातरणी ३९
करितां पुराण-मुनिनें ऐषीकास्त्र-प्रयोग नाकांत
सुरव आणि इषीकाशत कोंदे अरिंच्या सर्वांच नाकांत ४०
एकाहि सैनिकाला पात्यांनीं-लोचनां न झांकों दे
तें ऐषीक न केवळ खळ-बळ-नयनीं नभांत ही कोंदे ४१
नेत्रांत घ्राणांत श्रवणांत मुखांत सर्व-कटकाच्या
बहु शिरकत्या इषीका जेविं जगीं शक्ति विश्व-घटकाच्या ४२
ऐसा मुनिवर्यासीं करुनि हठें विजय-काम नाश रण
तत्काळ विमद होऊनि जाय धरुनि कुशलकामना शरण ४३
देउनि अभय म्हणति नर- नारायण होतसे मद नरा ज्या.
तो सर्व बुडे व्यसनीं होय मलिन यामळें वदन राजा ४४
जा स्वपदीं स्वस्थ रहा सुहृद धरुनि कास साधु-पदवीची
वद वीची माशावी द्युनदीची कीं नृपा कुनद-वीची ४५

१ क-अंड-ब्रम्हांडाचाहि, २ ब्रम्हदेवासहित, ३ यास, ४ तीक्ष्ण, ५ रिपुसेनारूप रात्री विषयीं तरणी सूर्य, ६ स्वर्गांत, ७ तत्काल, ८ गर्वरहित, ९ लहर-लाटा, १० स्वर्गंगेची.

रुचि लागली तशारसहि फार सदुपदिष्ट[1]-साधु-रीतीची
दुर्योधना त्यजुनि अभि- मान पहा तूंहि माधुरी[2] तीची ४६
यापरि नर मतापी नारायण अधिक बहु नराहूनें[3]
तेंचि धनंजय माधव नकळति साधूंत बहु न राहूनें[4] ४७
कण्वहि म्हणे कुरुवरा परिस तुला हाहि सांगतो कांहीं
कीं क्षाळावें[5] मारिलें जें पंकें-करुनि आंग तोकांहीं[6] ४८
मरव्यात शक्रसारथि- वर-मातलि-देह-संभवा[7] नावें
गुण-केशी रूप जिचें अमृत न पररूप[8] अंसें यानावें ४९
तीस वर देव-मानुष- लोकांत न आढळे म्हणुनि सांधी[9]
मातलि नारद-यत्नें पाताळीं-जेविं निधि रवणुनि साधी ५०
आला मनांस आर्यक- नागाचा पौत्र सुमुख जामाता
गुणकेशीची व्हावी हृष्टा[10] अवलोकितांचि ज्या माता ५१
आर्यक म्हणे सुरषें कवणा न रुचेल हें असें नातें
परि ज्या बळें करावें संतोषें मान्य म्यां असेना तें ५२
भक्षुनि माझ्या पुत्रा चिकुरातें सर्पकाळ पक्षीन[12]
वदला. या मसौत्रा सुमुखानें कीं तुलाहि भक्षीन ५३
वदला तेसेंचि करिल दुःसाध्या काय या प्रतिज्ञा त्या
ऐसें असतां देसी गुणकेशी काय याप्रति ज्ञात्या ५४
मातलि म्हणे दिलीच स्वसुता म्यां वचन काय फिरवावें

1 सत्-उपदिष्ट-साधूनें उपदेशिलेली, 2 मधुरता, 3 नरापेक्षां, 4 साधूंत बहु राहिल्यावाचून तेक ळतनाहींत. 5 धुयावें, 6 मुलांहीं, 7 इंद्राचासारथिश्रेष्ठ जो मातलि त्याच्यादेहापासून संभव- उत्पत्ति जीची ऐशी, 8 इतरस्त्रियांचेंरूप. 9 उदक, 10 दुःखित, 11 आनंदित, 12 गरुड.

जिरवावें दुःख तुम्हीं या मुनिला पौत्र-रत्न निरखावें[1] ५५
आम्ही दोघे विनवूं सुरपनिला तो समर्थ रक्षील
पक्षी लक्ष्मीशप्रिय परि अरि-भावें न यासि लक्षील ५६
नाग म्हणे त्या न पडों- द्यावें शोकांत आर्यका मातें
न तसे स्व-पितरीहि जसे येती लोकांत आर्य कामातें ५७
ज्याची महापुराणीं व्यास भगवदुक्तिसीच[4] मानत लिहीं
तो अभय आर्यकाला दे सुरपति-सून सचिव मातलिही ५८
नारद मातलि घेउनि आले सुमुखाहिला सुरसभेला
सुर-दृष्टि-मक्षिकांचा मोहक तो इक्षुचा सुरस भेला ५९
भरवोनि परम धन्या झाली लोकत्रयांत ज्या माता
तोही जेव्हां होता क्षीरधिचा सुर-सभेंत जामाता ६०
यद्यश-बुजगवणें दे भक्तांसि शिवों न काळ-कागातें
सदय शरण्यवर असें श्रुति-शत ज्या विश्वपाळका गातें ६१
पुरुषार्थासि न गावुनि सत्सद ज्याचे सुवृत्त भुज गातें
त्या प्रभुच्या पायांवरि घाली मुनि कथुनि वृत्त भुजगातें ६२
देव म्हणे हो दादा द्या अमृत न द्यावया पळ उशिर हो
न स्व-शरणागताचें काळ बळें आपुलें पळउ शिर हो ६३
शक्र म्हणे चक्र-धरा तन्नरवर न साहवे नव क्रेंकच
होइल त्या खगपतिचा महत्त्वें एकही न वैक्र केंचे ६४

---

१ स्वाधीन करावे, २ लक्ष्मी-ईश-प्रिय-विष्णुप्रिय. ३ श्रेष्ठ, ४ उक्ति; ५ नारद, ६ सुमुख-अहिला. ७ विष्णु, ८ काळरूप कावळ्यानें, ९ हे देवेंद्रा, १० करवत, ११ वांकडा, १२ केश.

जिष्णुसि विष्णु सिकवि कीं आधीं तों अमृत आणवा हूं या
त्याजवरि मज न मत्कृत सत्कृत हें असिच आण वाहूं द्या ६५
पात्र-मुखीं न पडे जरि तरि अमृत वृथा कशास सांचविलें
तें सत्य वांचणें जें शरणागत सर्व सत्व वांचविलें ६६
सम्भु-स्वीकृत म्हणुनि प्रभुनें अहिलाहि अमृत पाजविलें
साजविलें कारुण्य ब्रम्हांड भरूनि सुयश गाजविलें ६७
स्वर्गावरि गाजवुनि द्वेषिकरीचे महांत पारख वळे
येउनि सपींत इंद्रो- पेंद्रावरि बहु महातपा स्ववळे ६८
वद विष्णो मजवांचुनि जरि मेळविलें असेल यश कांहीं
सहुब्ळ देवांनीं जरि हरिजेल व्यजन कां न मश कांहीं ६९
देव म्हणे कवि म्हणती मीपण अयशा न बाहुला वाहे
मज मीच वाहतों तूं काय बरें एक बाहुला वाहे ७०
ऐसें वदोनि देतां स्कंधीं बहु भव्य-भुज-भर भरे हो
प्रभुचा मनाप तो न- न्मदें-कक्षी हुव्येभुज भरभरे हो ७१
हरि गरुडाचें मीपण हरि बाहुभरमनापसारें च
त्याचा गळतां मळसा मद उतरे सर्व तापसा रेंच ७२
भुज मोही त्यासि जसा रथ शिशु दर्वीकरा शिरवंडीचा
तो भर दुःसह रचिला बत्सावरि जेंवि गांश खंडीचा ७३
गरुडाचा गुरु-तर-मद उतरुनि निजभुजाहि उतरिला अजितें

१ शत्रुरूपहत्तीचे महान असे पंख गाजवुनि-स्वर्गावर वळे, २ महानपज्याचे ऐसा गरुड, ३ भार, ४ गरूडाच्या मद स्वतृणांत, ५ अग्नि ६ बाहु-भर-मनाप-सारें-च-भुजभारबलाधिक्यानेंच, ७ आवाजशब्द, ८ बालसर्पास, ९ मोराचा, १० विष्णूनें, × पेंडे.

अजि नें सदयत्व अतुल विधिहस्तें बिघडल्यास ही सजितें ७४
सावध होउनि गरुड प्रभुसि म्हणे वंदुनि क्षमस्व असें
घे दास्य तसेंचि पुढें जरिहि असा मंद अक्षम स्व-असें ७५
जो काय कुरसें दूषक अघें परि हरिता तसा चिकुर वाळी
निर्गर्व करुनि चुकला बहु परि हरि तानसाचि कुरवाळी ७६
तैसा तूंहि करिसि बहु गर्व परि कुयोधना न हें हित रे
कर साम पांडवांशीं सत्सख्यें संकटीं कुजनहि तरे ७७
हा नारायण पांडव- धर्मादि-कुरांश सबळ हे राया
पचके काळहि ज्यां त्यां शक्त तुम्हीं काळकवळ हेराया ७८
त्यातें कुयोधन म्हणे तुमच्या होणार काय हाकांनीं
ईश्वर-संकल्प बळी परिसोंचि नये प्रलाप हा कांनीं ७९
नारद म्हणे गुरु-वचन न गणुनि घेतोसि करुनि किति हास
दुर्योधना न आग्रह हित या विषयींच परिस इतिहास ८०
पूर्वी साक्षात् धर्म क्षुत्क्षाम वसिष्ठरूप घेवून
सत्यपरीक्षार्थ शिरे विश्वामित्राश्रमांत येवून ८१
गाधिज सादर सत्वर आंगें बहु पाक-कष्ट साहोनी
धांवुनि जाय तदर्थ स्वशिरीं सिद्धान्न-पात्र वाहोनी ८२
धर्म म्हणे राहेल क्षुधित द्विज-मंडळीं कसा चिर हा
सेवीन हेंहि पुनरपि येउनि तोंवरि उभा असाचि रहा ८३
ऐसें वदोनि जातां गाधिज राहे उभाचि वर्षभर

---

१क्षमाकर, २कुरस- यमुनेचें कुजल त्याचा दूषक-कालिया, ३अपाकर, ४काळाचे मुखांतील घास, ५यम, ६क्षुधेनें रुग्ण.

पात्र-भर न बहु गालव- परिचरणें बहुत होय हर्षभर ८४
भेटे वसिष्ठ-वेषें वर्षांतीं गाधिजास येऊन
सेवून नवोष्णान्न प्रेमें उद्गार फार देऊन ८५
तो साधु ब्रम्हर्षे साधु असें वरद धर्म बोलोनी
तोलोनि वसिष्ठासीं जाय भले डोलवूनि डोलोनी ८६
गाधिज शिष्यासि म्हणे वत्सा झालासि धन्य जा गेहा
जैसा दासहितार्थ स्वहितार्थ तसा सदा न जागे हा ८७
रक्षी गुरुसेवा हे सच्छिष्यशिशूसि गालवा जिवती
प्रिय ईश्वरासि ते बहु वंदुनि जे काय गाल वाजिवती ८८
गालव म्हणे वहावी पायांवरि काय दक्षिणा सांगा
गाधिज म्हणे दिली बहु वत्सा वदलासि तूं असें कां गा८९
कांहीं मागाचि असें असकृत् फुगवुनि उगेंच गाल वदे
अत्याग्रहें करूनि श्रीगुरु-हृदयासि ताप गालव दे ९०
गाधिज म्हणे विधु-धवल अष्टशत श्यामकर्ण दे वाजी
शिष्य अवश्य म्हणे वरि परि निजचित्तांत हाय देवाजी ९१
झाला त्या चिंतेनें केवल कृश हरिण-काय गालव तो
राजा आधि-हरिविणें भलत्या कवि-हरिण काय गालवतो९२
जेव्हां म्हणे बहु मनो- रुगजगरग्रस्तकाय गालव हा
गरुड म्हणे उडविन नग मग मित्रा आधि काय गालव हा९३
वाहे पृष्ठीं पाहे बहु यत्न करुनि तदाधि वाराया

१ टेंकर, २ पुनःपुन्हा, ३ चंद्रासारिखेशुभ्र, ४ मनोव्यथारूपसिंहारवैरीज, ५ मनोरुकूअजगरग्रस्तकाय.

परि गालवासि न पुरे धीर परमविकळ होय गा राया ९४
गरुड नव्हे मूर्तिमती ब्रम्हण्या विष्णुची दया तीनें
तें बहु कारुण्य असो भेटवि वित्तार्थ मग ययातीतें ९५
तेणें नाहीं तादृग्- धन-संग्रह म्हणुनि माधवी दुहिता
दिधली कीर्त्युपदेशें भावि नृपांच्या करावया रुहिता ९६
विकिली हर्यश्वदिवो- दासोशीनरनृपासि ती कन्या
तद्दत्तषट्शतहयां- सह मग गुरुलाहि अर्पिली धन्या ९७
पुत्र प्रथम वसूमना नामा संग्राम होय हर्यश्वा
गमला ज्या नरसिंहा- पुढें रणीं शत्रु-भूपवर्य श्वा ९८
मानी प्रतर्दनाख्यें पुत्रें बहु आत्मतप दिवोदास
त्यानुपजनांचि थांबुनि गुण देतो जेवि सपदि वो दास ९९
शिबिनामक पुत्रातें पावे हो वरुनियां उशीनर ती
स्वगुणजित निजपतिची पाहे स्थिर कीरडी उशी न रती १००
विश्वामित्रा वदर्या स्वयशाच्या पुत्र अष्टक विमानीं
साक्षात् गरुडचि त्यातें सर्वाधिव्याळदष्ट कवि मानी १०१
गाधिज म्हणे अहा रे गालव बा लवहि तूज न विचार
देतासि माधवी मज होते ऐसेचि पुत्र कवि चार १०२
ऐसा हरिभक्तहि मुनि गुर्वर्थीहि करुनि आग्रह श्रमला
गमला नलसख गरुडहि दुर्बळ कीं तोहि त्यासह श्रमला १०३
यास्तव दुराग्रह नव्हे हित सदुदित वाक्य कर उगा राया

---
१ कुत्रा.

सन्मत-धर्म-पराधरि कालहि न शकेल कर उगाराया १०४
मानें तोहि ययाति स्वर्गापासूनि पावला पतन
दौहित्रसाधु साधुनि देती त्याचें तयासि तें वतन १०५



## अध्याय ९

धृतराष्ट्र म्हणे कृष्णा मज हा दुर्वृत्त आकळेना गा
होतो मंदांध जो त्या स्वहित अहित काय गा कळे नागा[1] १
तूं प्रभु परमांस म्हणुनि करुनि कृपा या कुयोधना वळिव
बळि वळविला तुवां हा किति याला स्वहित बा पुन्हा कळिव[2] २
ज्याच्या वचनीं ब्रम्ह- प्रमुख कर्वांचा उदंड विश्वास
निश्वास वेद ज्याचे पाळी जो परम-आप्त विश्वास ३
तो प्रभु करी परोपरि परिहाराया अनर्थ उपदेश
जेणें केला केवळ बाळ ध्रुव साधु-मान्य कुपदेश[3] ४
परि तो न घेचि लेशहि आंत जसा कलश पालथा नीच
अहितकरत्व स्वमतें कल्पी अल्पायु बाल थानींच ५
जैसा निर्भाग्यांनीं सर्वार्थद[4] दत्त अतिथि वारावा
खळ कर्ण[5] अनादरिती त्यापरि त्या दुर्लभाहि आरावा[6] ६
दुर्योधना शिरावें न व्यसनशतावहीं दुरभिमानीं
भीष्म-द्रोण-विदुर-कृप- धृतराष्ट्र-गुरुक्तिला सुरभि[7] मानी ७

1 हत्तीस, 2 जगत्रयास. 3 कु-पद-ईश-उत्तमपदाचाधनी, 4 सर्व अर्थदेणारा. 5 कान. 6 बोधरूपशब्दास, 7 कामधेनु, + परम-आप्त.

भ्रमवी श्रमवी मळवी   पळवी सत्कीर्तिला दुराग्रह रे
सेव्य सदुपदेश सुधा   ग्रह-असदुपदेश हा सुराग्रह रे   ८
पांथांचा ताप तृषा-   तिळ तरि पावोनि सर अपेय शमला
[2]शम लाभ यांत आहे   आइक देऊंनको अपयश मला   ९
सेवूत सुरर्षि-मुखें   स्वर्गी सादर यशःकथा पितर
मद्वचितसामपोतें   दुस्तरविपदब्धि जन्हि तथापि तर   १०
काय तुम्ही भंगील   स्वगदाघातें करूनि भीम [4]नगा
त्रिपुरारिसख्याचेंही   पाहुनि निज-यक्ष-कदन भी मन गा   ११
सून बंधु जनक जननी   गुरु मित्र कलत्र यांसि पाव कसा
तुझिया वचोसि केवळ   दुःसह अर्जुन तृणासि पावकसा   १२
वदला ईश्वर पार्थानि   अर्जुन मजसीं भला झगडला गे
किति त्यापुढें बळ तुझें   खचवीसा मेरुला दगड लागे   १३
दिनमणिपुढें पळांत   प्राप्ता गति होय अंधकारा ती
तुज त्या राजर्षिपुढें   कीं तो प्रभु जेविं अंधकाराती   १४
सेना व्यसनीं तुजला   तारिल कोपेल जरि अजातारी
हरि स्वयत्नतां भयांते   खपतिमति काय गा [11]अजा तारी   १५
त्याचा प्रसाद हो बहु   कुरुदारांच्या न कोप तिलकीं हो
नकुळ सहदेव केवळ   अनलानिलसेचि कोपतिल कींहो १६
ते पांच त्यांत सावा   [12]हा याचा कोप या न साव्याही

१ शुष्क, २ शांतहो, ३ नारदमुखें, ४ पर्वता ; ५ कुबेराचें, ६ सैन्यास, ७ अग्निसारिखा, ८ सूर्यापुढें, ९ महादेव, १० धर्मराज, ११ बकरी, १२ ह्या मी कळी.

अभिमत तसें न माझ्या जामात्यांसकट मानसा त्याही १७
सत्यचि दुःसह आम्ही कृष्णा त्रिदशेश्वरासही राजा
त्या काय टंक भंगिल घनही भंगूं शके न हीरा ज्या १८
हो सावध सत्सरत्नें स्फरसत्तमसा स्फरवें कर विलास
तूं लोभें भ्रांत शकुनि- दुःशासन-वृष-सुखें करविलास १९
भीष्मादि म्हणे कुरुवरा दे यश यदुनायकासि या शम रे
कोण्हीहि सदुपदेशा मृतलवाहि मशितां कधीं न मरे २०
द्रोण म्हणे कृष्णाचें भीष्माचें वचन आयकावें च
सद्वाक्चिंतारत्नें थिरवरिसि कां भरतनायका वेंच २१
विदुर म्हणे शम पावें प्रेमें शोकें करूनियां न रडें
पितरांचें न पिळावें स्फुतशोकेंवृकें धरूनियां नरडें २२
धृतराष्ट्र म्हणे पुत्रा निर्भय अंतःपुरीं स्फरवें रम रे
शम रे गमो युधिष्ठिर इंद्र जगीं तूं उपेंद्रसा गम रे २३
व्हावा वळला अहि नहि मग देव म्हणेल कां नका त्याही
रक्षील तेज यापरि नीति न गुरुला कळे न काव्याही २४
भीष्म द्रोण विदुर हे कथिति पुन्हाही असें स्वबळास हित
न शिरें हठें वृकोदर- काळ-सुखीं बंधु-नृपबळासहित २५
कृष्णकरें भेट नृपा स्वांकीं श्रीधर्मराज तुज वाहो
त्याचा तूं राज्यभर- प्रोद्वहनसमर्थ बाहु उंच वाहो २६
तो दुष्ट म्हणे कृष्णा सर्व तुम्ही दूषितां मज चरवोटों

---

१ इंद्रासही, २ सत वाक्यरूपचिंतामणि. ३ स्फुत शोकरूप लांडग्यानें, ४ राज्यभारउंच लावयास समर्थ, ५ चांगल्यास, + शुक्राचार्याही.

पंडुसुतांला म्हणतो   फार भले सानुजा मजच खोटा   २७
ठावा नसे मज तुम्ही   सांगा अपराध कोण तो यांचा
बहुजन-वाद अनावर- वेग निरोधील कोण तोयांचा   २८
केलें स्वयें सुतार्थ   द्यूत निपुणता नसोनि धर्मानें
हारविलें धन कांहीं   पडला व्यसनांत तो स्वकर्मानें   २९
तेथें दोष शकुनिला   लावितसां कां मलाहि अनघाला
जाणोनि पक्षपाती   कां घालितसां नयांत मन घाला   ३०
तेंहि धन फिरोन दिलें   तरि लावितसां बळेंचि अघ लावा
साधु-समाधिस्थ-गळां   जेविं खळ-व्याळ-आळ न घलावा
घडला वनवास बरें   केला होता तिहीं नसाच पण
अज्ञातवाससमयीं   परि त्यांहीं रक्षिलें न साचपण   ३२
अपराध काय म्हणतो   कां सर्व युधिष्ठिरा करीं नमनें
मी क्षत्रियमानातें   सोडुनि हें मान्य कां करीन मनें   ३३
सांगा करीन ज्ञानदा   या सर्वद्विजजनासि मी नमन
न घिटे ब्राम्हण-नमना   क्षत्र-मन जसें वनासि मीन-मन   ३४
पांडव काय पविधरहि   येईल कापावयासि जरि मान
तरि मानवेंद्र मी न न-   मीन उपेक्षूनि निमेषभरि मान   ३५
न मज समजलें तेव्हां   जेव्हां दिधला विभाग मत्तातें
जे धन धूर्त हरितसे   काय कळे तत्प्रयोग मत्तातें   ३६
जितुकें काय सुतीश्णें   सूच्यग्रें भेद भूमिनळ पावे

१ उदकाचा, २ निरापराध्यास, निष्पाप्यास, ३ घालावा, ४ उदकास, ५ मत्स्याचेंमन, ६ वज्रधरहि-इंद्र, ७ सुईच्याअग्रानें;

नितुकेंहि अदेय तयां कीं मज खायास गृध्र तळपावे ३७
आम्हीं त्यांहीं हि महा- देवापरि या धरोधवा गावें
मागावें दास्य सदा वचनीं विमदापराध वागावें ३८
कुरुगुरु भीष्म द्रोण द्विष-तमोराशिचे रवि धुरीण
कैसें न फेडितील प्रभु हे श्रित-चित्त-कुमुद-विधु रीण ३९
मरण-भयें आरसि कसा मानाधिक गणुनि काय हा लवतो
अचळ अज्ञानिनें होइल चूर्ण-शिखर म्हणुनि काय हालवतो
मजपासूनि पावेल न शक्रहि मग कोण बळिनर विभागा
भा गातां ज्याची तो विधु कवि हो होय मलिन रविभा गा ४१
केशव कोपोनि म्हणे काय वदसि कविसभेंत अन्याया
दुर्योधना बहुमता तुजलाचि तुझ्या न उक्ति अन्या या ४२
अपराध नसे केला स्मरण नसे काय मन न आठव दे
तरि परिस मीच वदतों समयीं कोण न असोनि पाठ वदे ४३
अपराध तुझे विश्व- श्रुत त्यांचा लोपला नसे लवही
कुशलाहि चित्रगुप्ता लिहितां गुरुहि पुरली नसेल वही ४४
घूकासि जसा दिनकर तुज सुजनोत्कर्ष पळ पहावेना
तन्नाम तुला अहिला गरुडाचें नामसें सहावेना ४५
कितवा-करवीं कपट- द्यूतीं त्वां पांडुपुत्र नागविले
वागविले जे भीष्में स्वकरतळस्फोटसे न भागविले ४६

१ विष्णु, २ गर्व आणि अपराधरहित, ३ शत्रुरूपअंधकारराशीचे, ४ कार्यभार वाहाणारा रथाचाधूर वाहणारा. ५ आश्रितांच्याचित्तरूपकमळाचे चंद्र, ६ शरीर ७ पर्वत, ८ कांति-तेज. ९ बहुतमान्य, १० घुबडास. ११ कपटीशकुनी करवीं. १२ आपले करतळावरील.

ज्या साध्वीनें केली न सतींच्या तिळहि हानि रीतीची
सोडित होता स्वकरें दुःशासन दुष्ट हा निरी तीची ४७
मारायाभीम तुझा धरि संकोचासि न भुज गरदांनीं
या त्वद्गुणापुढें बहु मिरवावें तेज न भुजग रदांनीं ४८
त्वां वारणावतीं जतु-सदनीं कोंडुनि जाळिले होते
परि वांचले नशाहि-व्यसनीं दैवेंचि पाळिले हो ते ४९
ऐसे अपराध तुझे मेरुसम न या-समान वेनांचे-
बहुमत्त आपणाला न गणुनि धिक्कार मानवे नाचे ५०
यां साधूंचा बहुमत बोध सदा रुरु-सभा-जनां आमा
बाळाचा हा धरवे न तुज जसा रुरुस भाजना आमा ५१
देतोसि पाजितां हित-बोधामृत जरि बळेंचि ओकारे
ओ कोरेसि यमाच्या देसिल शोकाग्नि याहि ओकां रे ५२
तों दुःशासन बोले राया व्यसनांत वांच धर्म करीं
रगम न करितां कोरव तुज बांधुनि ओपितील धर्मकरीं ५३
भीष्म द्रोण विदुर हे तुज मज कर्णासि बद्ध करितात
हरितात प्राणातें झाला परं परमहितहि जरि तात ५४
ऐसें म्हणतां च्चि उठे क्षिप्र निघे दुष्ट मंडळीसहित
सत्त्वमतिपासकानिहि प्राप्त नव्हे दुष्टमंडळीस हित ५५

---

१ विषदानीं, २ सर्पाच्यादंतांनीं, ३ लाक्षागृहांत, ४ राजा विशेष याचें, ५ देवस भेतील लोकांस, ६ उत्तमरस, ७ पात्रा, ८ अपक्का, ९ वांतिशाळेस, १० गृहास, ११ शत्रु, + स्लन.

चित्तीं भीष्म म्हणे रे गंर्नोसि हरि विलंघ्य करिप क
देवासि म्हणे प्रभुजी न वळति ते ज्यांसि काळ करि पक्क
भीष्म-द्रोण-प्रमुखां वृद्धांसि प्रभु म्हणे अहो परिसा
चुकतां न्यायासि कसे बांधावा दुष्ट हा तुम्हीं अरिसा ५७
म्यां दुष्ट कंस वधिला वधितांहि नसेचि पाप मत्तातें
अनुभविला सर्वैही वंशीं केवळ न ताप मत्तातें ५८
देवासुरांत पूर्वी ऐसाचि विरोध होय बहुधा त्यां
लोकलया चुकवाया लागे हृदयांत आधि बहु धात्या ५९
मग धर्माला सांगुनि बांधुनि दैतेय निरविले वरुणा
ऐसी केली विधिनें लोकांवरि त्या खळांवरिहि करुणा ६०
दुर्योधन दुःशासन कर्ण शकुनि खळ तसेचि करकरुनी
बांधुनि धर्म-करीं द्या लोक बुडवितील हे निकर करुनी ६१
पुरुष कुळार्थ ग्रामा करितां कुळ तोंहि जनपदाकरितां
आत्मार्थ भू त्यजावी असि नीति* कळोनि कां असें करितां
अजि धृतराष्ट्र अजि महा- राज न हा साधु बांधवा यास
न करावा व्यर्थ तुम्ही हित-सूचक साधु-बांधवायास ६२
धृतराष्ट्र म्हणे विदुरा जा वाहुनि आण एथ गांधारी

१ हे-करिप- हरिं-विलंघ्य- क- गतां ऽसि- हे गजपते, सिंहाला उल्लंघून कोठें जाशील? २ उन्मत्तातें, ३ मत्- तात्- माझ्याबापानें, ४ त्यास, ५ यमाला. ६ दैत्य, ७ निष्कळ, ८ साधु-बांधव- आयास.

* त्यजेदेकं कुलस्यार्थे ग्रामस्यार्थे कुलं त्यजेत्
ग्रामं जनपदस्यार्थे आत्मार्थे पृथिवीं त्यजेत् १

सोडी कर कांतारीं करुण कवि नव्हे निजोनुगांधारी ६४
जीजी म्हणोनि जावुनि घेउनि आला सभेंत भावजये
पतिजवळि कलत्र नये कां हो सिद्वाम्बमांतसावज ये ६५
स्त्रीस म्हणे तो नृप सति[३] तूं तरि दुर्योधनासि बोध करीं
देणार अंतकाच्या स्वास्त्रसह सकळ सहाय योध करीं ६६
देवी म्हणे शिकवितां देवर्षि महायशांहि उपरंमला[५]
उपरंमला[४] भीष्म विदुर कृष्णाहि कथितां अशांहि उपर मला
ऐकेल काय गुरु-वच रुत आपण ऐकिलें कितिकसें जी
पावेल रूयत्ना स्त्रस्त्रव प्रसववि रूत वातहि हे दिति कसे जी
सांगेन यथामति परि कोठें तो नृप म्हणे बहो स्वात्या
आणी सभेंत वळवुनि विदुर पुन्हा वातसा महात्मा त्या ६९
गांधारी त्यासि म्हणे वत्सा बहु कष्टतो दुरभिमानी
कां त्यजसि गुरूक्ति इला आत्माधिक बहुगुणें स्त्ररभि मानी ७०
अन्यायकृष्णवर्त्मा न स्पर्शी कीर्तिकापुरा तनया
ज्या लोभा भजसी तूं भजले नाहींत वा पुरातन या ७१
कामें कोपें लोभें नागविले अमित यांस जे भुलले.
यांच्या कुदृष्टिपातें तेजस्वी पुरुषहीरही उलले ७२
न उगाचि मूकंसा[१०] तूं चित्तांत धरूनि दंभ दर्प रहा
वा दुरभिमान न बरा देइल धनेपतिकरींहि स्वर्पर हा ७३

---

१रानांत, २निज-अनुग-अंध-अरि-आपल्या आश्रयानें येणाऱ्या अंधाचा शत्रु होय, ३स्व-अस्त्र-सह, ४थकला, ५बोलाव, ६बंधु-विदुरा, ७कामधेनु, ८अन्यायरूपअग्नि, ९पुरुषरूपहिरेही, १०मुरव्यासारिखा, ११कुबेराच्याहातींही, १२खापर.

अहित कथील तरि कसा गुरु बाप कसा तसीच आइ कसी
नाइकसी गुरु-वचन क्षुद्र-वचन बहुजपोन आइकसी ७४
सत्त्वप्रेमें स्वामी न म्हणविती हे दयाभ्र मामांजी
मी राजा ऐसें जें काय म्हणसि खेद या क्ष्मामाजी ७५
राज्यार्ध पांडवां दे तूं घे राज्यार्ध बहु तुला बा हें
साम करीं यश रुसलें मुरडुनि तुज पाहतें मुला बोहें ७६
निष्कंटक राज्य करिसि हा महिमा सत्य पांडवांचा रे
सत्सख्य करूनि यशों धवल करा सत्यपांडु बांचा रे ७७
भीष्मद्रोणाचार्य प्राणांतें सोडितील न तयांतें
सामर्थ्य असोनि अधिक बहु ते आहेत साधु नत यांतें ७८
क्षुद्र-शकुनि-दुःशासन- कर्ण यश क्षुद्र-संग-रहितास
कोणा होइल केला भूत-बळें रुद्रसंगर हितास ७९
सर्व सुहृत्तम कृष्णा प्रभु याची कास धरुनि सर्व तरे
तूं किति तरले याच्या नामें बहु सागरांत पर्वत रे ८०
तुज पांडवजय दुर्घट नारळ हरिजेल काय खर्वतरें
कृष्णोक्तें सख्य करीं याचि उपायें अनिष्ट सर्व तरें ८१
ऐसें मातृवचन ही लंघुनि गेला उठोनि पुनरपि तो
जो भव्य पावणारा सद्गुरु-सद्वाक्-सुधेति सुनर पितो ८२
जाउनि सुयोधन म्हणे दुःशासन कर्ण शकुनि यांपाशीं
आम्हीं हितशत्रूंच्या कळत पडायें न ठकुनियां पाशीं ८३

१ सत्त्वावर आहे प्रेम ज्यांचें, २ धनी, ३ दयेचे मेघ, ४ भीष्म, ५ बोलाव, ६ ब्रह्मांड, ७ पांडवां तें, ८ अतिठेंगण्यानें.

जोंवरि आहों आम्ही स्वाधीन न बद्ध जाहलों ववधे
कृष्णासचि बद्ध करूं म्हणजे मेले[1]चि शत्रु ते अवघे ८४
कर्णादि म्हणति बांधूं यदुपा सदुपाय हा बरा कुचला
शीघ्र उठा लीलेनें पांडुसुतांतें करूं पसरसू चला ८५
तें इंगितज्ञ-सात्यकि कृतवर्म्याला हळूच जाणवुनी
प्रथम कुरुसभाद्वारीं सिद्ध करवुनि स्वसैन्य आणवुनी ८६
जावुनि सभेंत आधीं श्रीकृष्णाला कुमंत्र आयकवी
राजासि म्हणे मग भग- वदनुमतें सर्वसाधुराय कवी ८७
अजि धृतराष्ट्र प्रभुजी मी सात्यकि किमपि विनवितों परिसा
तुमच्या सुतें कराया बद्ध श्रीवासुदेव हा अरिसा ८८
हा सांपडतो[2] एका प्रेमा सुरव-कीर्तिच्या घटकु बंधा
प्रेमरहिता सुदुर्जय भगवंत जसा महाभट कबंधा ८९
हें काय हो विदुरजी परमप्रेमांस्पदांगजोंतातें[3]
द्यावें अनुमोदन निज- पर-गृह-दाहास जाणत्या तातें ९०
विदुर म्हणे अद्यापि स्वस्थचि तूं काय हें अहा तात
राया या यदुसिंहा त्वत्पुत्र धरावया पहातात ९१
हा यादवसिंह प्रभु धरितिल तव मत्तसुत मतंगज या
या दावपावकासीं[4] समर करुनि पावतिल पतंग जया ९२
देव म्हणे देवा द्या आज्ञेसि धरूत वीर हे मातें
कीं मी धरीन यातें शोधिति दहनांत धीर हेमातें ९३

१ कृष्णास; २ पर-असु-गतप्राण, ३ परमप्रेमास्पद पुत्रांतें, ४ दावानळाचीं
+ अभिप्रायानुरूप वागणारा, ※ मस्तकहीन शरीर-धड.

आतांचि धरुनि बांधुनि पांडवहस्तांत यांसि ओपीन
जरि धर्मकृत्य न घडे भुज केले व्यर्थ काय हो पीन १४
हें साधुधर्मकृत्यहि राहो न तुम्हांपुढें उचित मातें
जें प्रागल्भ्य-प्रकटन वृद्धांत नव्हे भलें शुचितमा नें १५
निंदित कर्म करें हो करिन कुलजवत्स मी परा ज्या जी
उचित प्रतिक्रिया मग दावीन प्रवत्समीप राज्याजी १६
अन्याय मी करीना कर्तव्य करो सुखें सुयोधन हो
व्येरु हो परंतु खोटा सभ्यजनाच्या मुखें सुयोध न हो १७
धृतराष्ट्र म्हणे विदुरा मजपासीं आण जाच पुनरपि त्या
काय करूं शूलाधिक दुःसहतर दुःखहेतु कुंवर पित्या १८
ज्यासि न साधु सहावे जेविं पहावे तुरंग न हल्यांला
त्यासि कवि पुन्हां आणी जो आग्रह मित्र-बंधु-सह त्याला १९

## अध्याय १०

धृतराष्ट्र सुतासि म्हणे रे कुरुकुलकीर्तिनाशका कुष्टा
इच्छिसि कृष्णप्रमुखा बद्ध करायासि काय रे दुष्टा १
प्रेमाचि एक यातें बांधुनि बहु कीर्ति दे यशोदेतें
अभिमत साधुनि देतें सुकृत कुकृतन कीं अरे यशो देतें २

---

१ पुष्ट, २ वि-असु-गतप्राण.

केवळ बाळचि इच्छी  वि[1]धुसि धरायासि कां ब[2]रा इच्छी।
म्हणत्येच सभा तुजरी  पिक-रिपु-काकासि आंबराइ ही  ३
बाहसि शिरीं तयातें  देतो जो गर्व भार ताप सदा
स्रुत्वकर गुरु-वर-कर-भर  दुर्धर तुज सर्वभारतापसदा  ४
विदुर म्हणे द्विविद कपिहि  नरकहि ज्यासि न धरावया शकला
त्यासि कसा धरिसिल जें  स[4]कला जड तें घडे कसें शकला[5]  ५
या धरिति न षष्टिमितें  निर्मोचनवारि दानवेयशतें
मी काय एक-मुख दश-  श[7]तवदनासहि न बानवे यश तें  ६
पाठविले यन्नामें  अरिहि करुनि मुक्त पूत नाकाला
बद्ध कसें करिसिल या  खलकेश्यघ-कंस-पूतना-काला  ७
बांधावया पहासी  जरि या मधु-कैटभांतकाला ही
तरि बांधावा भेकें  चक्रहण जागरूक कोळाही  ८
देव म्हणे रे मंदा  एकाकी वासुदेव हा काय
इच्छिसि बद्ध कराया  तरि आधीं नीट तूं पहा का[11]य  ९
ऐसें वदोनि उघडुनि  दावी निजविश्वरूपता पावे
कीं पाहोनि निवावे  साधु सकळ दुष्टभूप तापावे  १०
तेजोमय प्रकटले  प्रभुच्या ब्रम्हांडकोटिगेहांत
ब्रम्हादि-देव यादव  पांडव अंगुष्ठमात्र देहांत  ११
दे हर्ष वि[12]श्वरूप-  प्रभु-भास्कर स्रुजन-न[13]यन-नलिनातें
बहु ताप दे स्वतेजें  खल-घू[14]कानें स्व[15]भाव-मलिनांतें  १२

---

१ चंद्र, २ ब्राह्मणा. ३ भारत नीचा, ४ पूर्णास. ५ तुकड्यास, ६ साठ. ७ शेषासही. ८ मंडुकानें ९ हर्षानें मारणारा, १० काल-अहि-कृष्णसर्प. ११ देह, १२ विश्वरूपी ईश्वर हाच कोणी सूर्य, १३ सज्जनाची नेत्रें हींच कमळें, १४ घूत करणारांतें. १५ स्वभावें करून पातकी.

भीष्म द्रोण विदुर कवि संजय निर्मळ तपःपर महर्षी
हे दिव्य-दृष्टि देवुनि केले करुणाकरें परम हर्षी १३
देवांनीं वाजविलीं वाद्यें तेव्हां सुरवें अवधिरहितें[1]
होय मुहूर्तभरि भुवन बधिरचि सत्कविसुरवें अवधिरहि तें १४
बहु-पुष्पवृष्टि होय ब्रम्हांडींही न माये परिमळ तो
या प्रभुयशें तुराया निळहि रवळांचा उरेचि परि मळ तो १५
धृतराष्ट्र म्हणे प्रभुजी संसारीं हा कृतार्थ हो पाहो
या जात्यंधासि तुम्ही डोळसपण पळभरीच ओपा हो १६
त्या वृद्धा जात्यंधा राजाला विश्वरूप दावाया
अर्जुन-चातुर्याच्या निधिला विधिलाहि लाज लावाया १७
यत्प्राप्त्यर्थ श्रीमन्- दस्त्रशिरींहि[4] गुरुपदीं सदा लवतें
रविचेंहि दृगघभंजन अंजन कंजनयनें दिलें लव तें १८
अंधत्व अंधकूपचि त्यांतुनि होवूनि दिव्यचक्षु निघे
प्रज्ञाचक्षु क्षणभरि बहु सुरव तें विश्वरूप लक्षुनि घे १९
वृद्धा अगस्त्य हो हा मन्महिमामृतसमुद्र आटो पी
ऐसें मनीं म्हणोनि प्रभुवर तें विश्वरूप आटोपी २०
न वळे गतायु-जन तें उत्तमचि जसें सुवैद्य मानुनि घे
सात्यकि-कर धरुनि तसें तेथुनि यदुवंश-पद्म-भानु निघे २१
ज्ञानेंचि जना हो न प्राप्त वयें केवळ स्थविरता हो

१ अवधि-रहित-बहुत. २ मावे, ३ जाअंजनाच्या प्राप्ती करितां, ४ अश्विनीकुमारांचेंशिर, ५ दृक्-अघ-भंजन-दृक्‌दोषनिवारक. ६ कंज-नयन-कमलनेत्र कृष्णानें, ७ हे वृद्धा धृतराष्ट्रा । तूं अगस्त्य हो, ८ माझा महिमा हाच अमृतसागर. ९ गत-आयु-मरणोन्मुख, १० यदुकुलरूपकमळाला सूर्य.

जरि बुद्धिवृद्ध असता जैसा भेडा जळस्थ विरता हो २२
जाऊनि सभाद्वारा पावे तों प्रभुवरासि पावाया
अंध म्हणे प्रभुजी हो स्पष्ट अनीश्वर म्हणोनि पावा या २३
दुर्मति दुराग्रही कृत आटोपायासि अंध अक्षम हा
जो जो यत्न करावा तो केला त्यां तुम्हांसमक्ष महा २४
प्रभु मुरडोनि म्हणे हो जन हो जो परम-अहित-कर असा
त्या-कृतनिश्चयविषयीं म्हणती आपण अनीश हें परिसा २५
अजि बाल्हिक अजि भीष्म द्रोण विदुर हें तुम्हांसि कळलें कीं
हे धृतराष्ट्र अनीश्वर यांचें चाले न लेश बळ लेंकीं २६
आलों बहुदूर रहा येतों धृतराष्ट्रजी पुरे परता
कथितों धर्मासि असें कीं यश दिधलें तुम्ही भलें भरता २७
बोलेल कृपणवचन स्वमुखें कां काय देव कीनाश
कीं भक्तकीर्तिनाश न-साहे साहेल देवकीनाश २८
स्वरथीं चढोनि भगवान् मग जाय पुसावयासि आतेला
तोंचि वदूं कोण रसिक गोघृत सोडुनि करील आ तेला २९
सांगे कुयोधनाचें- मत संक्षेपें यदुद्वह सतीतें
धर्मासि निरोप पुसे कृतमार्दव आठवूनि हसतीतें ३०
कुंती म्हणे वद असें त्या मत्तनयासि कमळनयना कीं
परिसोन पूर्वजतुजा- प्रेमें-कृतगीत- अमळ नय नाकीं ३१

---

१ स्त्री, २ असमर्थ, ३ अकल्याणकरणारा, ४ न-ईश-असमर्थ, ५ कुंतीला ६गाईचेंतूप, ७ पुत्रानें कोमलत्व, ८ माझ्यापुत्रास:+ यम

वाटे सुभटें पुत्रें मेळविला विप्रसेवनीं नव टं
वर्षों ऽण्णा-सह-जटिल-चर- नगि काय बहुत-नसे वनीं न वटे-३२
वर्णिति रिपूंत समरीं दाखवितां बाहुबळ जना भाट
ब्रम्हा नामीं दुसरा योग्य क्षत्रा न जलजनाभा ट ३३
जें सिंधुराज-विजितें- स्वसुतातें बोलिली सती विदुला
तें परिस सांगत्यें तुज यदु-कुल-कमला ऽकराचिया विधुला ३४
विदुला म्हणे अहारे क्लीबा मंदा कसा पळालास
कां वांचलासि अयश- स्कर ऐसा तूं न कां गळालास ३५
अरि हरिल राज्य मग तूं वरिशिल वृत्त्यर्थ काय माधुकरी
सुखकर सुकर्म टाकुनि असुखकर कुकर्म कोण साधु करी
मद्योवन संजय हें निजनाम हि बुडविलें तुवां दगडें
झगडें यशोर्थ अरि-रथ- चक्रांहीं स्पष्ट लोष्टसा रगडें ३७
जेणें लज्जित व्हावें स्वर्गीं सद्पूर्वजें तुज्या तातें
परमाऽनुचित पलायन कैसें केलें तुवां कुजाता तें ३८
मरण विहित न पलायन भीती धर्मज्ञराजकन्या या
अन्यायाहुनि अधिका घडल्याही न गणतीच अन्याया ३९
साधूंसि बाहुजाच्या मत विजय जसा तसाचि वध मत रे
निजधर्माश्रित न बुडो निजधर्मच्युत कधीं न अधम तरे ४०
अधमा तुवां मरावें क्षणहि न बुडवूनि मान वांचावें

---

१ दूर सुभट होता तो सुभट झाला काय?, २ पर्जन्य उघ्यास हत करणारे तापस श्रेष्ठ, ३ वडाचे रस.
४ ब्राम्हणास, ५ हें कमलनाभा कृष्णा, ६ सिंधुराजानें जिंकलेला संजय, ७ विदुला नामक स्त्री, ८ चंद्राला
९ चरितार्थ, १० भिक्षान्नभिक्षा, ११ ढेंकूळ, १२ कुत्सितजन्म, १३ क्षत्रियाचा, १४ आपल्या धर्मानें चालणारा.
* भट्ट हें नाम ब्राम्हणाला योग्य- क्षत्रियाला-भट, + नपुंसक.

काळा यासम अन्यहि जे असतिल त्यांहि मानवां चावें ४१
तो संजय तीस म्हणे पुत्राच्या इछितीस कां मरणा
वांछिनि ग्रामा अकाम- मज्ञ इतर इच्छिती सकाम रणा ४२
रडसील सस्नुषा कीं मज जरि देइल परास्कृता समर
न म्हणेल स्वर्मींहि शतपुत्राही परा स्कृतास मर ४३
जी व्यर्थ उभयलोकां- ऽनुपयुक्त अपत्य यादवी ती तें
स्पष्ट करी वात्सल्य ज्ञाते जन म्हणति गाढवी तीतें ४४
निजलासि काय उठरे जय पावतसे सदा समरशील
उत्साह टाकितां तूं दैन्यें सांग न सदास मरशील ४५
संजय म्हणे नमस्ते जननि जन निशाकरें जसा निवतो
बोधें तसा निवालों न हितकर गुरूपदेशासा शिव तो ४६.
विदुलोऽक्त करी संजय जिंकुनि समरांत सिंधुराजाला
सिंहाला तोचि उचित- कृत जो मारूनि सिंधुरा जाला ४७
सांग स्वसख्यासि असें झाली त्वत्सूनकीं गगनवाणी
कीं कुंति हा अरि वधुनि पद साधिल तुज स्करवा मग न वाणी
होतिल सकळ-खळ-वधीं हरिहरमुख या बुधा स्कर सहाय
चित्तीं म्हणेल याच्या कीर्तिरसें जिन-स्कथा-स्करस हाय ४९
तें सत्य असो तेंही जें युद्ध पुरांऽतकां-महेशासीं
महीरसूत्वहि श्री स्त्री कीर्त्यऽपहार-काम हे शौसीं ५०

---

१ स्नेहसहित, २ मरण, ३ जिला शंभरपुत्र तीही, ४ दोन लोकीं ही नाहीं उपयोग ज्याचा, ५ युद्धकरणें हा ज्याचा स्वभाव तो, ६ दासांसहित, ७ नम-स्ते- तुला नमस्कार असो, ८ चंद्रानें ९ गजाला, १० जन्मकाळीं, ११ पुर-अंतक-रुद्र, १२ माजे वीरपुत्राचें प्रसवणें, १३ शासनकर.

भीमासि म्हण द्यूतीं नेलें जिंकूनि वित्त भीमा जें
तें न स्मरे न तुमच्या वनवासालाहि चित्त भी माजें ५१
सलतें मनांत दुष्टें वोढुन नेली सभेंत कृष्णा तें
स्मरली त्यांहि उपेक्षा करितां हरितां निरीस कृष्णातें ५२
त्यास्मरणें मन पडलें तापीं बहु जेविं तळमळत डागें
हृदयें मोह उघडिला जैसा ग्रीष्मांत तळमळ तडागें ५३
दावावें यश जोडुनि कुळजानें सुप्रसन्न-वदन कुळा
प्रथम पुसोनि कुशल मग जगदीशा तूं असेंचि वद नकुळा ५४
अयशस्कर लोक पळहि मळवाया धाम वा न रांगावें
जरि न गमेंचि तरि स्मरवें चित्र-रचित-राम-वानरां गावें ५५
हें क्षत्रियासि समुचित ऐसाचि निरोप सांग सहदेवा
जो पांचांत यशस्कर तो माजा पुत्र मूर्तमेंह देवा ५६
कृष्णेसि सांग कृष्णा तिळभारिहि तुजें उणें नसो शील
त्वां साहिलें असें पळ- मात्रहि सर्वसहा न सोशील ५७
सति तव सभाप्रवेशीं रामेंहि विलोकिलें परश्वश्रू
निर्लज्जा कठिना मी मरतीच नदा भली पर श्वश्रू ५८
त्वां रक्षिलें न झालें क्षम रक्षायासि मत्तनय नातें
असते क्षम चरण-नखा स्पर्शोंदेते न मत्तनयेंनातें ५९
जन्हि बुडविलीस माज्या पुत्रांहीं व्यसन-गर्त-लीनाहीं

१ द्रव्य, २ द्रौपदी, ३ तळावामळ, ४ तलाव, ५ कुल-ज- सत्कुळोत्पन्नानें, ६ मूर्तिमंत उत्साह, ७ सर्वसहन करणारी पृथ्वी, ८ परशु आणि अश्रु, ९ सासू, १० उन्मत्तांच्या नेत्रांनें, ११ व्यसनरूप खळग्यांत लीन.

तद्धि न विटलीस यापरि सत्वें कोणीहि वर्तली नारी ६०
किं बहुना सांग तयां समयीं जें काय चांगलें कांहीं
कृष्णा मन्यत हें कीं यश रक्षायें न आंग लें कांहीं ६१
सांगा म्हण बाहूतें पुरवाया स्वजनकाम हा भागा
मागायाचें तुज हें नाहीं म्हणसील कां महाभागा ६२
पाहों नको मजकडे बा निज-बिरुदाऽवलीकडे चि पहा
काय स्तनार्थि-शिशूच्या शब्द उचित सांत्वनीं पडे चिप हा ६३
नसुनि निघे किमपि प्रभु न वदे त्यावरुनियां असें वाटे
कीं कृत्वा दर्शयते प्राज्ञ असा भाव कीं गळा दाटे ६४
इंद्रांसि पुसे स्वरथीं कर्णाला सबहुमान-बाहुनि घे
शक्र-प्रमुखब्र-महाभुज- भुजगाधिप-पूज्यमान-बाहु निघे ६५
प्रभुवर तेथुनि जातां धरुनि मनीं फार कोप देशाला
भीष्म द्रोण पुन्हाही करिति खळा तारकोऽपदेशाला ६६
दुर्योधनासि न रुचे सांगति जें सदुपदेशपटु ते नें
मधुररसीं उपदेशीं ज्वर खळ आणिति बळेंचि कटुतेनें
घाली होवुनि तिर्यग्- दृक्-नत-मुख भोंवयांसि तो गांठी
केवळ द्विताऽक्ति कृत्या भासे त्या काळदृष्टि ज्या गांठी ६८
भीष्म म्हणे जो बहुमत ईश्वरसा सत्यलोकपाळाला
त्या वत्सासीं विग्रह हा आलें काय हो कपाळाला ६९

---

१ किंबहुना- फार काय सांगुं, २ चिप उगार हा हा शब्द, ३ किं- कृत्वा- दर्शयते- प्राज्ञ- ज्ञानी कृष्ण काय करून दाखवितो, ४ इंद्रप्रमुखानी पूज्यमान- पूजित आहेत बाहु ज्याचे असा कृष्ण, ५ तरण्याविषयीं उपदेश, ६ सत- उपदेश- पटु- सदुपदेश करण्याविषयीं कुशळ, ७ कडूपणा, ८ वक्रदृष्टि, ९ अधोवदन, १० गांठल्ये, ११ ब्रम्हा, १२ देह-

द्रोण म्हणे पुत्राऽधिक कीं पोषी नित्य शिष्टता पार्थ
त्यावत्सासीं विग्रह हा झालों काय शिष्ट तात्पार्थ ७०
जो वळला फळ लागुनि न श्रीदेवर्षिला न पितरांला
वळला न ईश्वरासहि तो दुष्ट वळेल काय इतरांला ७१
मंत्र करुनि कर्णातें देवूनि निरोप जाय अरिपाणी
ज्याचे पितो घट घट घट घट घडि घडि घर्षीहि अरि पाणी ७२
अंध म्हणे रे संजय जो या दुर्बुद्धियाप्रसां गमला
प्रभुहंस अहित नेणें केला तो मंत्र काय सांग मला ७३
श्रीकृष्ण म्हणे कर्णा तूं कुंतीचा कुमार कानीन
[1]खहृदनोत्थ न पडला अर्थिजनाच्या कधींहि कानीं नं ७४
ऐसा वदान्य विद्वान् विश्रुत तूं ऋत विप्र-जन-दास
चाल भजोत भ्रातें तुज चातक भजति जेविं घनदास ७५
देईल अजातारी मद्वचनें आजि राज्य अग्र्याला
भ्राता न वळेल कसा वळवीलचि धर्म-वायु अभ्रा त्या ७६
साऽनुज-कृत-धर्म तुला नमिल सयादव करीन मी नमन
सच्चित्त गुर्वऽनादर तोयानादर करी न मीनमन ७७
राज्याभिषेक करितिल तुज मजसह-विप्र-भूमिप दरानें
किंबहुना घेइल तव तांबूल क्षिप्र भूमि प हरानें ७८
चाल करा हो राजा मातेच्या मानसासि दे सुख गा

---

१नारदास. २ शत्रु, ३ अविवाहितकन्येचापुत्र, ४ नकार, ५सत्यवादी, ६ मेघास, ७धर्मराज, ८बंधू
वांचून दुसऱ्याल्हाहीं, ९ सत्-चित्त-साधूंचेंचित्त, १० गुरु-अनादर-गुरूचाअनादर, ११ तोय-अनाद
र-उदकाचाअनादर, १२ मत्स्याचेंमन, १३ राजे, १४ थुंकीझेलील. + चक्रपाणी, ✱ स्वत्-वदन-उ
त्थ-तुझ्यामुखांतूननिघालेला.

यांचा तुज काकांचा सहवास जसा सितच्छदा स्वरवगा ७९
कर्ण म्हणे बा देवा वदसि स्नेहेंचि बा दयाळो हें
भट-कर-गेंजोडाची स्पर्शमणीची करी दया लोहें ८०
मातृत्यक्ता मजला राधाहस्तीं दिलें अधिरथानें
मज पाजाया प्रेमें पय पळ धरिती तिचीं न धिर थानें
निष्फळ करसें करूं गा बा परिहृत-सर्व-नत-नराऽधे तें
भल्याबांचुन घ्यावें जोडुनि स्रुतशोकवतन राधेनें ८२
दुर्योधननावांचा राजा मी सर्वराज्यभोग मला
सूर्त नरक नरकाविच्या हृदयाला जो कृतघ्न तो गमला ८३
संस्कार विवाहाऽवधि केले माजे यथोक्त सूतानें
निर्मळपणें निघावें रक्तपटांतूनि केविं सूतानें ८४
समरभरवचि होवूंद्या सभिय सेवून नव्य न गदांनीं
पुण्य रणमरणदानीं वीरां जें तें न कल्यनग-दानीं ८५
पतितासि सांवरी मृदु स्फुचि हा उपदेश केशवा तूळ
जैसा अंबाऽर्पित अति- रुग्णांसि पदार्थ-लेश वातूळ ८६
श्रीकृष्णजी कसाचा कैसा विश्वासघात अवसानीं
युद्ध कसें न करावें आम्हां हा युद्धलाभ नवसानीं ८७
तरि मग उरलें काय प्रभुजी त्यजित्या जरि प्रतिज्ञा त्या
नच सोडवेल देवुनि धीरभरवंसा अरिप्रति ज्ञात्या ८८

१श्वेतपक्षहंसास, २स्व-स्वगा-उत्तमपक्षि; ३ कसोटी, ४ लोखंडानें, ५ परिहृत-सर्व-नत-नर- आधि-हरणकेली सर्व नम्रजनाचीं संकटें जाणें; हे कृष्णा, ६ श्वेतसूतानें, ७ युद्धयज्ञ, ८ दाण्या, ९ कापूस, १० रोग्याला, + रोगांनीं.

राज्य न करील देइल धर्म मला उमजतांचि हें नातें
देइन सुयोधना मीं तेव्हां होइल तुम्हांसि हें ना तें ८९
आटोपिला न पहिला तो आटोपेल काय गाऊन
जोडा यश कवि होउनि रोमांचव्याप्तकाय गाऊन ९०
धर्मानीतींच मिळे सद्गति सत्कीर्ति शुद्धि अधमातें
राज्यपदभोग नलगे द्यावा देवा रणांत वध मातें ९१
मज समजलें प्रभो हें स्वद्दृष्टिपुढें उरेल न क्षत्र
रवि काळरुद्रदृष्टिसि न पुरे तेथें पुरेल नक्षत्र ९२
तूं स्वाऽश्रितप्रतिज्ञा करिसिल न धरुनि शास्त्र सत्या गा
उरतिल कैसे करितें- झाले जे हरुनि वस्त्र सत्यागा ९३
देव म्हणे राज्य नको उपदेश अयोग्य काय हे महिम्या
क्लीबाला कन्यासी तुज कां द्यावी बळेंचि हे महि म्यां ९४
जेथें भीम धनंजय बहु-दुःसह वासवा रणाजिर तें
हरिलंघन असतांही बळि-गज-सहवास वारणा जिरतें ९५
धनदानें अधनाच्या तुमच्या तैसाचि काम रणदानें
म्यां पुरविजेल द्यावीं स्वरगें इतरें न कां मरणदानें ९६
जा सर्व सिद्ध व्हा जरि आहे उद्युक्त मानस मराया
सम रायास तुम्हांसहि भीमाऽर्जुन वरद शीघ्र समरा या ९७
देईल कुरुक्षेत्रीं धर्म प्रभुवर तुम्हां निधनदानें

१ रोमांचांनीं प्रफुल्लित देह ज्यांचे, २ क्षत्रिय, ३ सतीच्या-आगा-अपराधा, ४ इंद्राला, ५ रणांगण ६ सिंहलंघन, ७ हत्तीला, ८ धन-द-कुबेरानें, ९ रण-द-युद्धदाता भी-स्वानें, १० मृत्यु.

धनदानें जसिं येणें न दिलीं उदकें तथाविध नदीनें ९८
कर्ण म्हणे या वचना मान्य न झालों म्हणोनिको पावें
वध्यें वधाचि म्हणतां प्रभुनें आग्रह म्हणोन कोपावें ९९
सत्य उपदेश आम्हीं वरिचेवरि भव्यहेतु झेलावे
जाणोनि सर्व देवा लाविसि कां बोल हे तुझे लोंवे १००
स्वप्नांत पाहिले नृप शांतनव द्रोण हार्दि दाता हे
घेऊनि उष्ट्रयानीं बैसुनि दक्षिणदिशेसि जाताहे १०१
रक्तोऽष्णीषधर सकल कुरुश्वेतोऽष्णीषधर तिघे मात्र
कृप कृतवर्मा अश्व- त्थामा मलय-ज-रजो-धवलगात्र १०२
शुभ्र-सहस्र-स्तंभ- प्रासादीं धरुनि शुभ्र माल्यांला
चढला धर्म श्वेतो- ष्णीषा दन्तोडुपप्रभा त्याला १०३
सहदेव नकुळ सात्यकि भीमाऽर्जुन धर्म तूंहि बापा हे
सैम तुम्हीं श्वेत-गजीं ऐसें स्वप्नांत कर्ण हा पाहे १०४
श्रीकृष्ण म्हणे बहुधा मरणारचि हे समस्त कुपदेश
कीं तव हृदयें माझा हितहि स्वीकारिला न उपदेश १०५
कर्ण म्हणे भेटि असो परलोकींमात्र बा दयाळो कीं
कळहीं स्नेह न राहे हे दुर्लभ म्हणुनि पाद या लोकीं १०६
ऐसें म्हणोनि कर्ण प्रभुला कडकडुनि भेटला रविचर

---

१ तशी, २ नदी-समुद्रानें, ३ स्वैळ, ४ भीष्म, ५ उंट, ६ रक्त-उष्णीष-धर-आरक्तपा गोटी धारण करणारे, ७ चंदनरजाप्रमाणेंशुभ्रदेह, ८ शुभ्र सहस्र खांबांच्या गृहाला, ९ पुष्पाला, १० दन्त-उडुप-प्रभ-चंद्रकांतीदंताचा, ११ सात, १२ शुभ्रगजारूढ, १३ कु-पद-ईश-राजे, + हितहेतु.

मुग्धासहि जडित कनक- मरकत नग न गमला तसा रुचिर
झाला मंत्र असा मग आला नगरांत कर्ण परतोन
पर तो न प्रसु कोपे वरि पुरता पूर्ण आंत पर तो न १०८



# अध्याय ११

विदुर म्हणे बाइ पृथे यासम विश्वांत हे महास्खल गे
गुरु अंध अंधरूपचि याचे दुर्योधनादि सुत खळ गे १
वरकड उगीचि सर्वां अनर्थांचा एक अंध हा निकर
कीं राधासुत दोघे हे कुरुकुळकुशाळ कीर्ति-हानि-कर २
कुंती त्यासि म्हणे हो भावोजी शिशुपणीं असें घडलें
मत्पुत्ररत्न पदरीं राधेच्या मद्दुराग्रहितें पडलें ३
जावुं दिलें परकरीं निजशस्त्र तसें अपत्य हाहा तें
वा निजघात अर्थेवें त्यां केला आपुल्याचि हा हातें ४
येइल मनासि तुमच्या तरि हें नातें तयासि कळवीन
पळवीन धर्मचित्त स्नेहगुणें आकर्षुनि वळवीन ५
विदुरानुमतें कुंती गंगातीरीं सुताकडे गेली
नकळत तदुत्तरीय- च्छायेंत उगीच तों मतां ठेली ६

---

१ पात्र, २ अलंकार, ३ सुंदर, ४ मसलत- एकांतविचार, ५ कर्ण, ६ कीर्तीची हानि करणारे, ७ माझ्या दुष्टचेष्टितानें, ८ शत्रूच्या हातानीं, ९ तत्-उत्तरीय-छाया, कर्णाच्या उत्तरीयवस्त्राच्या छायेंत, + अज्ञान्यास.

कर्णाचा नियम असा  ब्रम्हजप करीत निश्चळ रहावें
तापेल पृष्ठ तोंवरि  रविचें मंडळ निरंतर पहावें  ७
नियमांऽतीं कुंतीतें  पाहूनि म्हणे धरूनि राग मनीं
राधेय आधिरथि मी  तुज नमितों काय कार्य आगमनीं
कुंती कर्णासि म्हणे  वत्सा कौंतेय तूं न राधेय
राधे यथेष्ट म्हण परि  कर्णा कर्णासि फार बाधेय
हेंमात्र न ऐकवतें  स्फुरवद मला मनुर्दुमिलन राधेय
कानीनपुत्र माजा  कर्णा कौंतेय तूं न राधेय  १०
रविचा औरस पांडु-  क्षेत्रज तूं पाळिलें अधिरथानें
स्रवति पय न न पोरसति  जाणो तीं जाहलीं बधिर थानें ११
सुर्धेलें त्यजुनि तुला  चुकल्यें आतां स्वबंधु रक्षावें
साधो धर्मज्ञें त्वां  अनुज स्वतनुजसमान लक्षावे  १२
ज्येष्ठ श्रेष्ठ श्रेष्ठ  प्रभु तूं देतील तुला पद भ्राते
जी जी म्हणतील चरणीं  वाहतील धना यशा अदभ्रा ते
सेवावें शौर्याचें  कीं रसिकें घेनुचें रसवर्राज्य
त्वां सर्व अनुभवावें  भ्रात्यांसह हें यशःप्रसव राज्य  १४
सोडुनि सूत कुयोधन-  पक्षांतें झडझडोनि वा निघ रे
विघरो दायादांचें  बळ मन दंकुळ जसें जळीं विघरे  १५
तूं आत्मारामा पंच-  प्राण तसे बंधु सत्य बापा हें

---

१ पाट, २. कानाला-य-पाधनो-राधे म्हण परंतुराधेयम्हणूनको, ३राधेयहेंवर्ण, ४ मनुदु यावर्णांनीं मिळितयुक्तजे राधेय हेंवर्ण तें मला स्फुरवद म्हणजे गमधेनु यद्रुपसे, ५ अविवाहितकन्यावस्थेंतला, ६अज्ञानपणानें, ७पुत्राप्रमाणें, ८रसांत श्रेष्ठ-आज्य, तूप.

नांदा एकत्र नको द्वेष करूं मजकडेचि बा पाहें १६
बा कर्णा तूं अर्जुन राम जनार्दन समान साजाल
हंस तसे साधूंच्या सोडुनि तुम्हीं न मानसा जाल १७
जेविं महाऽध्वरवेदी-[1] माजि सस्वर सत्यनायक[2] विराजे
तेविं विराज स्वपदीं भ्रात्यांसह वर्णितील कवि राजे १८
कुंतीवचोवसानीं[3] सूर्यापासूनि असी निघे वाणी
सत्य पथ्योक्ति गुरु-वचनें[4]- निरता सुखकीर्तिची[5] नसे वाणी
कर्ण म्हणे सन्माता तोकीं[6] सुख द्यावया असु[7] खरचिती
किंवा नेत्रें झांकुनि द्याया सुख आपणा असुख रचिती २०
माजा घात पुरवला तुज त्यांचामात्र घात पुरवेना
काय असें अघ विदलें कां त्वन्मन मज जसें स्वपुर वेना[8] २१
न म्हणेल काय माता द्यावा लोकांत आत्मज न नीच
रक्षील धर्मरक्षनि जी ती भलतीहि आत्मजननी च २२
अरि हि न करिल असें त्वां केलें कां नख[+] न लाविलें जननीं[9]
जन नीच मज न म्हणते परि काय करील नियंतिला[10] जननी
कृष्णें जसी यशोदा त्यजिली तसि न त्यजीन राधा मी
ती यातना न नरकीं होय कृतघ्ना न जी नरा धामीं[11] २४
वसु[12] जेविं वासवाच्या[13] माज्या साऽनुज सुयोधन मनातें
रंजवितो मज करितो सर्व तदाश्रित-सुयोध नमनातें २५

---

१ यज्ञवेदिकेमध्यें, २ सत्यलोकाचा स्वामी ब्रह्मा, ३ कुंतीच्या भाषणांतीं, ४ गुरुवचनपालकाला, ५ न्यूनता. ६ बालकीं, ७ प्राण, ८ वेनराजास, ९ जन्मतांच मरणार्थ कंठास नख कांन लावलें, १० दैवाला, ११ गृहीं, १२ अष्टवसु, १३ इंद्राच्या. + जन्मतां.

अर्जुनवधप्रतिज्ञा केली ती कशि दहांत सोडावी
तोडावी कुरुपतिची प्रीति कशी म्यां अर्कातें जोडावी २६
म्हणतील प्रकट सकल लोक मज त्वन्मतोऽनुगा[1] भ्याला
सावं कर्पूराच्या काय मर्षांगर्भसाम्य[2] गाण्याला २७
मारीन अर्जुनासचि समरीं धर्मादिकां न वधघां मी
कलिच्या मर्दीं अलिस[3] जी बहु तीहि मिळेल काय वधघामीं
म्हणतों[4] मीच नतजन- न मरण हरी परम सरळ करी नवधा[5]
यद्भक्ति तत्सख्याच्या प्रभु कवण म्हणेल मी करीन वधा २९
जा भागलीस कल्प- द्रुमसंश्रितकाम[6] कां न पुरतील
स्वस्थ रहा पांच तुझे सुत साऽर्जुन कीं सकर्ण उरतील ३०
कुंती म्हणे अभयवर आत्मा आम्हीं जडें असों देहें
बहु तुजपुढें न वदवे यश जोडीं स्मरण वा असोंदे हें ३१
आलिंगुनि कर्णातें भिजउनियां अश्रुनीं पृथा परते
चित्तीं म्हणे सरवे जे होती फिरतांचि विधि[7] वृथा पर[8] ते ३२
सुज्ञ म्हणति कोपावा विधि परि ज्याचे न पाय कोपावे
धर्मोप्रति वात्सल्यें- स्वीकृतदूतत्व[9] देव तो पावे ३३
भेटुनि अजातरिपुला संक्षेपें वृत्त कथुनि आर्यां तें
रात्रौ सविस्तर कथी त्याच्या नाशावयासि आर्थीतें ३४
कृष्णा म्हणे स्वच्छ न वळे कथिला धर्मोऽर्थलाभ सुगमहि म्यां

---

१ तुझ्या मताला अनुसरणारा जो मी मला, २ कज्जल, ३ भ्रमरास, ४ वध करीन असें मान म्हणतों, ५ नवविधा, ६ कल्पवृक्षांश्रितांचे मनोरथ, ७ दैव, ८ शत्रु. ९ वत्सलतेनें ग्रहण केलें दूतत्व ज्याणें.

शमले नारद कण्वहि बोधुनि त्या मूर्तपाप युगमहिम्या ३५
भीष्में स्वकथा कथिली सत्यवती प्राप्तकाम जाणूनी
होऊनि ऊर्ध्वरेता शीघ्र दिली ती पित्यासि आणूनी ३६
दिधलें विचित्रवीर्या सत्यवतीच्या सुता पद भ्रात्या
त्यांचे विवाह तन्मृति ऐशा कथिल्या कथा अदंभ्रा त्या ३७
प्राणांसहि त्यजिति परि न त्यजिति क्षणहि जी प्रति ज्ञाते
कथिली मातेच्या ही वचनें त्यजिली न जी प्रतिज्ञा ते ३८
जन्म व्यासापासुनि कथिलें धृतराष्ट्र-पांडु-विदुरांचें
सर्वा-सुखदा-राजक- पीडित-लोका-धिशोलशिदुरांचें ३९
क्षितिनें अंध त्यजिला वरिला जो पांडु उचित राज्याला
चाखील तेल रसना काय त्यागूनि शर्कचितराज्याला ४०
विश्व ज्येष्ठ श्रेष्ठ प्रेष्ठ असें ज्या स्वपितृनिभा गातें
तो पांडव धर्म कसा सांग नव्हे योग्य या विभागातें ४१
गाती अजातरिपुच्या हे सर्व परा सुयोधना महिम्या
द्यावी त्यासचि वसुधा तुरचूनि परा सु-योध-नाम हि ज्यां
तांतचि योग्य नव्हे मग राज्याला योग्य तूं कसा वद रे
पद रेखिलें कपाळीं विधिनें त्याच्या तुज्या अयश सदरे ४३
ऐसें बहु भीष्म वदे गुरुहि म्हणे मिळुनियां स्वभावांसी
भोगीं राज्यसुख वृथा कां करिसी भेद सुस्वभावांसी ४४

---

१ मूर्तिमंतपापयुग कलियुग त्याच्यामहिम्यास- दुर्योधनास, २ ब्रम्हचारी, ३ बहुत. ४ धृतराष्ट्रादिकांचें विशेषण-उत्तरार्ध-एकपद- सर्व- असुखद- अराजक- पीडित- लोक- आधि- शोल- सिदुर, ५ जिव्हा, ६ शर्कचित राज्याला, ७ प्रिय, ८ पितृतुल्य, ९ हे साधुशत्रो.

हा ब्राम्हण भीष्माश्रित   साक्षात्वद्दत्तवृत्तिकारा[1] या
सदहितजनसंपर्कें[2]   सुकृताची होय मृत्तिका राया ४५
मी गुरु त्यांचा तुमचा   त्यांचें तुमचेंहि सत्य जें विहित
तेंचि कथावें म्यां या   अन्नवस्याम्या सुकृतासि जेंविं हित ४६
धर्माला भीष्मप्रभु-   वचनें राज्यार्धभाग दे यांचें
न भलें ओग[3] भल्याचें   क्षणतीरहि पचेल ओग दे
जिकडे नदीज[4] तिकडे   मी मन्मन अक्षकालकेतुकडे[5]
सोडुनि सदन्न सेविल   कोण सुधी भक्तचि वालुके तुकडे ४८
विदुरहि सभेंत वदला   तातानें[6] तेंहि आयका सारें
कावनेंचि तृप्ति कर्णा   घ्यावी तृषितासि काय कासारें[7] ४९
लीलेनें उद्धरिला   स्पष्ट बुडविलाचि वंश पर मागें
कां आजि बुडों देतां   या पामरपापपौत्रपरमागें[8]
बुडविल कुळ हा लोभी   हा क्रोधी हा असाध्य हा कामी
कां न तुम्हांही परिसा   मारित-आलों भयाचि हाका मी ५१
बापाजी आम्ही हीं   चित्रें तुमचा अनुग्रह चितारी
निर्मुनि शोभवुनि पदीं   स्थापुनि पूजुनि अनुग्रहींच तारी ५२
गेली हृद्यर्णी मति   जोडा सुतपांवनांत सु-तपानें
धृतिला[9] पळउनि मूर्च्छा   न शिरो तुमच्या मनांत सुतपातें[10] ५३
घ्या धृतराष्ट्रासि चला   ही जसि नसि वृत्ति ती न सापाया[11]

---

१ तूं दिलेली वृत्ती चालविणारा, २ सत्-अहित-जन-संपर्क-साधुद्वेष्या जनाचा समागमानें
३ अपराध. ४ भीष्म, ५ अक्षकाळ हनुमान तो केतूवर म्हणजे ध्वजावर ज्याच्या त्या अर्जुनाकडे
६ भीष्मानें, ७ सरोवरानें, ८ पामर आणि पाप जो पौत्र-नातू-सुयोधन त्याच्या परम आगानें-अपराधानें, ९ धैर्याला, १० पुत्राच्या पतनानें, ११ अपायसहित.

कीं सदनांतुनि काढा न करूनि उपाय तीनें[1] सापा या ५४
राज्य कराल तरि जना तारूनि आपण तराल राघवसे
त्या काय राज्य जेथें कामक्रोधादि-दुस्तराघ[2] वसे ५५
स्वपरविनाशाऽपेक्षा कां करितां ह्या प्रसन्न यशा रक्षा
भोगार्थ काय रामें होऊं न दिलें कलत्र[3] वश रंडा[4] ५६
चिंताऽग्नीनें अंतः- संतप्ता सर्वकाळ जी चुलती
बहुवदली वाहतसे बहु तुमची सर्व काळजी चुलती ५७
दुर्योधना तुजे हे जन्मप्रद होहि विदुर भावोजी
यांसह म्हणत्ये होऊनि बद्धांजलि ज्यासि कुरुसभा वोजी ५८
देवव्रत मामाजी प्रभु यांचें राज्य भारताऽपसदा[5]
गुरुच्या प्रसाद नसतां हरिसहि दे राज्य भार ताप सदा ५९
भज यांला हे कामद ईश्वर हितबोध परिसं हे व्यास
धर्मासीं सख्य करीं स्वर्मींहि करूं नको चि हे व्यास ६०
हे ही पांडु हि विदुर हि या यांच्या भोगमूर्ति हे शिव रे
पाण्यापरीस पातळ करिते तुज परि नव्हेत हे शिवरे ६१
धर्म न्याय पहातां धर्मासचि सर्व राज्य ओपावें
मामाजीनीं तुजवरि त्यादूतोपक्रमींच कोपावें ६२
घ्यावें सर्व जिहीं जें अर्ध करूनि साम देववावें तें
हूं म्हण भेटों आला तुज पसरूनि वामदेव[6] वावेतें ६३
शक्रासहि न मिळालें मूरवा मिळतें कसें तुला यश तें

---

१ कर्णशकुनिदुर्योधन या तीन सापांस. २ दुस्तर-अघ-पातक, ३ स्त्री, ४ राव णास. ५ भरतवंशामध्यें नीच, ६ शिव.

महिषघ्नीभंग[+] रणीं   करिजेल प्राकृतें[1] लुलायशानें[2] ६४
धृतराष्ट्र म्हणे पुत्रा   सोमापासूनि ययाति जो सावा
ज्याच्या भुजें प्रजाभर   भूभर[3] शेषें नसाचि सोसावा ६५
तत्पुत्र पांच त्यांत   ज्येष्ठ यदु समर्थ शुक्रकन्याभू[4]
त्या अवज्ञा तद्गुरुची   शापोक्त प्राप्त होय अन्या भू[5] ६६
न करी गुरुवच म्हणुनि   ज्येष्ठा[6] यदुवरिहि होय भू रुसती
अनुसरलीच कनिष्ठा   असकरसकनेच्या सुनाहि पूरुस ती ६७
यत्कीर्ति[7] परिस अधिक न   तृप्ति सुधेची सुरांसि दे वापी[8]
प्रपितामह-प्रतीप   प्रभु त्याचा ज्येष्ठ पुत्र देवापी ६८
वदल्या प्रजा असें कीं   आम्हा भर्ता नकोचि हा कुष्ठी
काय करावी श्वानें   केली चारवांनि जी सुधा उष्टी ६९
रडत प्रतीप वदला   याहि भवविषोदधीस[9] देवापी
जेव्हां तपोवनाला   गेला. सदन त्यजूनि देवापी ७०
होता पितृमृतिसमयीं   दूर महाराज-बाल्हिक भ्रातसा
शंतनुला दे क्षिति कीं   याच्या राज्यांत-मात्र न मर तसा ७१
तैसाचि अंध म्हणवुनि   मी अनुचित[10] जाहलों अवन्यवना[11]
अनुभविल कसा मादृश[12]   गहना राज्या जसा अवन्य[13] वना ७२
पांडु कनिष्ठहि राजा   कीं विदुरहि तृप्त यत्सुगुणपानें[14]

---

१ सामान्यें, २ महिषशानें, ३ भूभार. ४ देवयानीपासून-भू-जन्म ज्याचें, ५ पृथ्वी. राज्य. ६ वृषपर्व्याची कन्या शर्मिष्ठा तिच्या. ७ ज्या पुरूची, ८ सुधेची पुष्करणी, ९ संसाररूपविषसागरास, १० अयोग्य, ११ भूरक्षणा, १२ माझा सारिखा, १३ जो वनांत न रहाणारा, १४ ज्याचा उत्तम गुणाच्या प्राशनानें; * महिषासुराचा भंग करणारी जी देवी तिच्या प्रसंग.

कार्य कुर्शांहि सजीवें तें होइल काय पुष्ट[1]कुणपानें ७३
राज्या[2]नर्ह पिता मी कैसा राज्यार्ह तूंचि वद नातें
परधन हरुनि न लाजसि दारवधिनां या दृष्टांत वदनातें ७४
धर्माचें राज्य दिलें सदनुमतें[3] नसि[*]त्यासि मत्तातें
मत्ता तें तुज तुमजें कोण करिल सावधान म[5]त्तातें ७५
वदला यापरि बा परि स्थापरिला परिस तेंवि त्या बोध
तो धन्य आग्रही बा तैसा न मिळेल केलिया शोध ७६
बहु मी हि भागलों बा बांधुनि दगडासि कां न भागावें
स्वक हृदय शून्य केवळ शून्य असें व्यर्थ कां नभा गावें ७७
मोदन होतों देउनि राज्य सकळ करुनियां स्त[6]वर्णन गा
परि न दळे कर्ण नशा यत्नलवें टाळितों सुवर्ण नगा[7] ७८
दे तो प्राण न स्तनधन दृढ निजकर्माभिमान चोरा ज्या
युद्धार्थ कुरुसेना गेला घेवूनि सैन्य तो राजा ७९
जो मी हितार्थ गेलों कीं दुःखी मग्न सस्कृत अंध नहो
त्या मज करीत होता दुर्योधन नृप धरूनि बंधन हो ८०
वदले न युक्त कुरुगुरु सम्यक्कांवि विदुरमात्र वदला हो
एकें कांय करावें परि म्हणतो धर्म राज्य पद लाहो ८१
धृष्टद्युम्न शिखंडी द्रुपदनृप विराट चेकितान तथा
युयुं[10]धान भीमकर्मा भीमहि ज्याची प[11]री असह्य कथा ८२

---

१ पुष्टशवानें, २ राज्याला अयोग्य. ३ साधूंच्या अनुमतानें. ४ विचित्रवीर्यें, ५ उन्मत्तातें, ६ स्तुति, ७ मेरुपर्वत, ८ सपुत्र. ९ उत्तमज्ञानी विदुर, १० सात्यकि, ११ शत्रूला. * पांडूस.

ऐसें धर्में केले सातां अक्षौहिणींत सात पती
जे तप न ताप द्याया रात्रिंहि अरिघूकमानसा तपती ८३
द्रोण कृप शैल्य सैंधव गुरुनंदन शकुनि कर्ण कृतवर्मा
भूरिश्रवा कुदक्षिण बाल्हिक विख्यात जो कृकृतवर्मा ८४
अक्षौहिणीहि अकरा करुनि त्यांचे पती असे अकरा
ख्यात्यांसि म्हणे यांच्या सत्कारीं आळस क्षणहि न करा ८५
मग भीष्मासि कुयोधन नमुनि म्हणे व्हा तुम्हीच सेनानी
कुज्ञसमर्थपतिविना जय कैसा पावितील सेनानीं ८६
ख्यात-यशस्वी इच्छा- मृत्यु तुम्ही कुरुकुळांत वासवसे
स्थिर तुमच्या धन्वीं यश कीं कुरतरुच्या फुलांत वास वसे
सेनापति मुख्य तुम्ही व्हाल तरि विप्रां करूनि शक्र रणं
लीलालेशें मद्रिपु- विषवृक्षांचें कराल उद्धरणं ८८
अरिबळ तसें तुम्हा तम दावांना जोंवं वदन दीपातें
तुमचा प्रताप रिपुतें नुरवि जरा घटज नदनदीपातें ८९
चालों पुढें तुम्हांला करुनि जसे करिति लोक शक्र दिवा
केला त्या गांगेयें विस्मय जो काय तो करा त्रिदिवा ९०
भीष्म म्हणे काय करूं समर्यीं शरणागता न सोडावें
आलें असे कपाळा कीं स्वभुजांशीं स्वयेंचि भांडावें ९१
स्वहित पुसतील पांडव तरि सांगुनि संकटांत तारीन

१ घुबड, २ दृढकवची, ३ सेनापति, ४ प्रसिद्ध, ५ इंद्रासारिखे, ६ माझ्याशत्रुरूपवि षवृक्षांचें, ७ अंधार, ८ अगस्त्य, ९ सागरातें, १० स्वर्गाला, + उत्पाटण- उप टणें, * सैन्यानीं.

प्रकट प्रहार पहिला केल्यावांचुनि परा न मारीन ९२
ज्याशीं युद्ध करावें म्यां क्षितिवरि कोण गा असा मान्य
कीं मजवरि प्रसाद श्रीमद्गुरुचा जगीं असामान्य ९३
मत्सम एक धनंजय योद्धा गुरुसंकटींहि[1] अभ्रांत[2]
प्रकट न भिडले मजसीं इच्छील मयूर काय अभ्रांत[3] ९४
सद्गुरुलब्धास्त्रबळें[4] क्षणमात्रें करिन निर्मनुष्य जगा
सुर असुरहि न मजपुढें टिकतिल उरतिल कसे मनुष्यज गा
न घडेल पांडवक्षय दहनांतहि[5] + कचि कुयोधना वांचे
परि अनृण व्हावया मी मारीन अयुत कुयोध नावाचे ९६
स्पर्धा करितो मजसीं सूनात्मज[6] हा करूं प्रथम रण हो
कीं मजचि पांडुपुत्रां- पासूनि प्राप्त रूप्रथ्य[7] मरण हो ९७
कर्ण म्हणे कुरुराया जें समरीं पावतील हें[8] मरण
तेंच करिन विजयासीं रक्षाया हें स्वमित्रहेम[9] रण ९८
अभिषेक स्वीकारुनि जेव्हां गांगेय होय सेनानी
तेव्हां वंदुनि केले बहु जयजयकार सर्वसेनानीं ९९
झाले भूकंपोल्का-[10] पाताद्युत्पात तेथवां बहुत
कीं होणार तदस्त्र- ज्वलनीं बहु शस्त्रभृत्कदंब[11] हुत १००
जो द्रोणाचार्याचा द्रुपदें यत्नें विनिर्मिला काळ
तो धृष्टद्युम्न करुनि निजसमासौहिणीच भूपाळ १०१

---

१ मोठ्या संकटींही, २ निःसंशय, ३ मेघनाश. ४ सद्गुरुपासून प्राप्त असल्याच्या बळानें, ५ अग्नीतही. ६ कर्ण, ७ विख्यात, ८ हे, भीष्म, ९ मित्ररूपसुवर्ण, १० भूकंप — उल्का-विद्युत्पात- इत्यादि गाशुभचिन्हें, ११ शस्त्रधर राजसमूह, + जो कचित् दहनांतही वांचो.

धर्मे सेनापतिपति केला सुमहायशा धवळवाजी
वदले ज्यासि सुरवधुनि अस्मद्रिपु जग यशें धवलवाजी १०२
जाय कुरुक्षेत्राला आधीं धृतराष्ट्रसुत अनंतर तों
जो साधु म्हणे मन हरि- चरणीं व्हायासि सुख अनंत रतों १०३
तेथें भेटुनि केला हर्षित शंकित बळें अजातारी
तोंहि जयाचा ह्यक्षर- उपदेश महाध्वर्मी अजा त... १०४
बळें धर्मासि म्हणे बहु वदलों कीं योग्य केशवा समता
परि अर्जुनप्रियास्तव झाली न मदुक्ति केशवास मता १०५
कृष्णावांचुनि कांहीं संसारीं प्रिय मला नसे लव हीं
हे मूर्ति मज जरी तसि धनिकाला बहुमता नसेल वहीं १०६
भुलला हा तुज जैसा भागवताच्या सुभागवत नाचो
न असा प्राकृतहि झटे साधाया निज सुभाग वतनाचा १०७
अभिमान यास तुमचा जैसा ऐसा न आमचा कांहीं
त्वत्कार्य या भुजाहीं शकटाचें जेंवि काम चाकांहीं १०८
हा जिकडे तिकडे जय येतो संबंधिवध पहावेना
भेटाल पुन्हा मजला तीर्थस्नानोर्थ ता रहावेना १०९
जातां मागुनि भगवान् बलभद्र बळें निजानुजा फिरवी
मिरवि प्रभु प्रभूत प्रेम प्रेमाश्रु लोचनीं जिरवी ११०
रुक्मी सहाय व्हाया आला अक्षोहिणी बलासहित

---

१ श्रमकरा, २ धर्मराज, ३ बळरामें, ४ युधिष्ठिर, ५ कृष्णा, ६ तप तप असा, ७ ब्रम्हदेवास, ८ मान्य. ९ नाचाला. १० गाडीचें, ११ तीर्थाटनाविषयींउद्युक्त, १२ निज-अनुज-कृष्णाला, १३ बहुत, १४ रुक्मिणीचाबंधु, + बळराम.

कीं वाटलें करावें धर्माचें त्या तशा खलास हित ॥ १११
तो मधुसमक्ष गर्वें करुनि म्हणे अर्जुनासि साधि न हो
भ्यालां कां लीडनें तुमचें मी सर्व कार्य साधिन हो ११२
भीष्मकरकृत मी परि भुज- वीर्यें केवळ नव्हेंचि भीष्मेंकसा
वांचेल मजपुढें तो द्रोण कसा तो हि वृद्ध भीष्म कसा ११३
घ्या भाग कर्ण कीं कृप कीं भीष्म द्रोण सर्व अथवा घ्या
धर्मस्थापन मघवा गावू वाजवुनि चित्ररथ बाध्या ११४
जेविं अमृतमदाला कांजिक दावूनि सुरस हा चातें
त्या पामरें म्हणावें तांहि म्हणे जेविं सुरसहायातें ११५
सस्मितमुख नर नारा- यणमुख पाहुनि म्हणे सहाय मला
श्रीगुरुपदप्रसादचि बहु तदितर तुच्छ सर्वथा गमला ११६
भ्यालों कसें म्हणेन क्षत्रिय मी द्रोणशिष्य हरदास
उरवळीन ईश्वरीच्या हरिच्याहि महाभयावह रदास ११७
करितां कृपा सुरासुर- मोडुनि जाळूनि खांडवास गयीं
सांग सहाय तशा त्या होता जन कोण पांडवा समयीं ११८
खळ काळकेय दुर्मद गंधर्व निवातकवच यां गमला-
हा हर तेव्हां होता समरांत सहाय कोण सांग मला ११९
हा कौरवांस हरिहर- दास जसा नकुळ घोणसा गमला
काळचि विराटनगरीं होता सुरसहाय कोण सांग मला १२
आराधुनि हरिहरगुरु येतांही तत्प्रसाद हानातें

१ आधि-युक्त. २ टेकुण, ३ चित्ररथनामागंधर्व, ४ अर्जुन, ५ शिवाचादास, ६ दांतास. ७ मयासुरीं. ८ मुंगस. ९ घोणस म्हणून सर्पजातीय एक जनावर आहे. आणि तो कोकणांत असतो.

[1]ध्यालों म्हणोल त्याच्या  कां न म्हणावें दृष्टांत हो तानें १२१
नाहीं [1]ध्यालो नाहीं  किमपि सहायप्रयोजन नहि राया
जा कीं अन्यत्र रहा  धर्मबळ असे द्विषयश हिराया १२२
दुर्योधनाकडे मग  जाना झाला असेचि गर्व तसा
कोणाला बुडवीना  अयशीं उदकीं शिरःस्थ पर्वतसा १२३



## अध्याय १२

अंध कुरुक्षेत्रकथा  पुसतां संजय म्हणे कृतांसनयें
धर्माकडे उलूका-  भिध-दूत धेंपिला तुझ्या तनयें
धर्मासि म्हणे धरिता-  झाला व्रत मूषकार्य ओतूं तें
स्वीकारिलें म्हणुनियां  आलें तत्साम्य देन ओ तूतें  २
आजिवरि तुझें धार्मिक-  पण आम्हां सत्य भासलें होतें
म्हणति कवि स्तविलें परि  लोभें साधुत्व नासलें हो तें ३
समरस्वधर्म स्फुगनिद  यांत तरि स्फुरुचि असो नहो कुरुची
कुरुचीका माशीशी  न शिवे क्लीबासि कीर्ति हो कुरुची ४
कृष्णासि म्हणे दावूं  ऐशा आम्हींहि इंद्रजालातें
हें किति धीरांसि न दे  भय पूजी नित्य इंद्र जाला तें ५
स्मर वचन वधुनि कौरव  दे हें धर्मासि राज्य साधूनी
कीं अर्क दोर्खिंजैतो  देखोनि असत्यसंध साधूनीं  ६

१ हाय हाय, २ कारण, ३ द्वेष्ट्यांचें यश, ४ मस्तकीं ठेवलेला, ५ मार्जार. ६ अनावड. ७ कुत्सित रुईच्या चिकास माशीशिवत नाहीं तशी, ८ कुरुवंशाची, ९ वज्र, १० असत्यसंधाचें तोंड पाहिलें तर साधु न दोष परिहारार्थ सूर्यावलोकन करतात, * कृन-अति-अनय-केला आहे मोठा अन्याय ज्याणें. + मंत्रविद्येनें.

आहेत भृत्य[1] बहु मी स्पर्श करिन न तुज कंसभृत्यातें
जो अयशोवायसभृत्[2]- स्पर्शेना कीर्तिहंसभृत् त्यातें ७
भीमासि म्हणे रण तुज काय तुवां विविध अन्न रांधावें
रूजल्पा अससिल आधीं मागाया अन्न मन्नरां धावें ८
तूं बरवा न रणीं तूं स्पष्ट पुरस्कार्य[3] पुष्कळीं अशनीं[4]
तूं किति थाळा अक्षम दुःशासनरक्त प्यावया अशनी[5] ९
माद्रीपुत्रांसि म्हणे म्हणसि करुनि युद्ध कां मरेन कुळा-
रक्ष रहा सानुज[6] दे जळ हाही शत्रुकाम रे नकुळा १०
सहदेवासि म्हणे त्वां कां रे जीव न दिला परवश स्त्री-
कृसि देखिली सहाता दासीचाहि न विलापरव[7] शास्त्री ११
विजयासि म्हणे आम्हां आहे दिव्यप्रभाव-धनु ठावें
त्वां खद्योतें इच्छुनि- कुरुगुरुभानुप्रभावध[8] तुं ठावें १२
कंसारि सहाय तुझा तोचा न असेल कां मला खोटा
परि बरवा आंत न जो तो काय करील काम लाखोटा १३
कर्ण नदीसुत[+] कुरुगुरु कोण रणीं पळविना शतमखातें[9]
यां जिंकितासि तरि जरि- रविसि करुनि बळविनाश तम खातें १४
किति न दोघे कृष्ण तुम्हीं असतां शत न जिंकिते तथापि कवी-
हें तो असा नयांची समरक्षेत्रांत जयकथा पिकवी १५
रे कूपदर्दुरा[10] किति डुरडुर करिसी वृथा न भाग रहा

---

१ सेवक. २ अकीर्तिरूपकाकपक्षीधारणकरणारात्याला, ३ पुढें करावयाजोगा. ४ भक्षणाविषयीं. ५ वज्र. ६ बंधुसहित. ७ रुदनशब्द, ८ द्रोणरूपसूर्याच्यातेजाचानाश, ९ इंद्रातें, १० विहिरीतील बेडूक, + भीष्म.

काय तुझें भाग्य अरे मंदा त्वां पाहिला न सागर हा १६
यापरि उलूकवदनें ऐकविल्या विषकेंदूग्रसंदेशें
केले वृद्ध विराट द्रुपद हि बहु तप्त त्या रूमेंदेशें १७
खळवाक् कोप पराच्या उग्वी होनाचि भीमयोधमनीं
काय म्हणे कल्पांतीं रुद्रालिकनयनदहन यो धर्मनी १८
आला कोप जन्हि तन्हि न मोडिनि सहज क्षमेसि रूसिक ते
येने तरि यांपासीं यांच्या रूगुणांसि कां न रूर शिकते १९
तेव्हां भीम हरिकडे पाहे नेत्रेंकरूनि शोणाभें
बहुधा देवहि भ्याला त्याचें वाटेल मग न कोणा भें २०
देव म्हणे शकुनिरूना जा म्हण त्यालाहि एक फटकाळा.
जागविला पुच्छीं त्वां देउनि पद बहु सर्पूर्वफट काळा २१.
वांचाया ब्रम्हांडा- बाहिर जाचूनि जरि रहासील
मत्यापित-अर्जुनरथ निजकर्मविपाकसा पहासील २२
मारुनि म्हणे उलूका हें कुरुकुळ बुडविलें तुझ्या तातें
यास्तवचि बुध न घेती संबंधी सर्वथा कुजातातें २३
म्हण त्यासि मत्प्रताप- ज्वलनासि बळेंचि लाव कच पेट
साहेल काय हरिची गज गरुडाचीहि लावक चपेट २४
आतांचि पडोनि गळां रड मग समरक्रतूत्तमीं न रडें
दुःशासनरूरुचें क्षते- ज प्राशीन पिळुनि सिंह मी नरडें २५

१विषाममाणेंकडुउग्रनिरोप, २अत्यंतमूर्खशिरोमणिनें, ३शिवाच्यालल्लाटनेत्रस्थवह्नि, ४कुंरूणी, ५रक्तवर्ण. ६फटकळाला, ७भीम, ८कचकण-केश, ९न्हावापक्षी, १०युद्धयज्ञोत्तमीं, ११दुःशासनरूपरुरुमृगाचें, १२रक्त, +प्रीति, ॥ः सर्पाला.

आधीं वधीन अधमा अनुज तुझे मग तुला गदाघातें
होइल मघश लोकीं तुझिया कुरुकुळमहागदा घातें २६
धर्मासमस्त वेधिन तुज पाडुनि लव शिरीं स्वपद डावें
न चुकेल हें परि तुवां मात्र रणमरव त्यजूनि न दडावें २७
जिष्णु म्हणे आर्या हर म्हणतिल साक्षात् तुजप्रति ज्ञाती
जी दुष्करा महेंद्रा केवळ सुकरा तुज प्रतिज्ञा ती २८
शकुनिसुता सांगा या त्याला माज्याहि या निरोपा पी
उदकें भंडा जैसा याच्या श्रवणें चि तो विरो पापी २९
केवळ मूर्ख अधम तूं ऐसें कळलें तुज्याचि संदेशें
कीं योजिला परबळें अस्मत्परिभव तुवां सुमंदेशें ३०
यावरुनि गमे अशनहि निज-जठर भरावयासि मंदेशें
त्वां करिजेल परमुखें कीं करिजेताति जेविं धंदे शें ३१
कैवार तुझा घेउनि आम्हावरि शस्त्र धरुनि यो जीन
सोडुनि घृणा तृणावरि- दवसे शर नमुन करुनि योजीन ३२
भीष्मासूतें म्हणतिल मच्छर दुष्टाकडे नका राहूं
गुरुसहि सुखें म्हणावें करितां विहितीं हितीं नकारा हूं ३३
होउन सहाय तुज जे रामा शक्रा सहाय कपि नाकी
कुरुगुरु भीष्म द्रोणहि किंबहुना लोकनायक पिनाकी ३४
होतिल भग्न मजपुढें जेविं रविपुढें वलीहि मंदेहे
धर्मांश्रित जय पावे न अधर्माश्रित न यांत संदेह ३५

१ कुरुकुळालामोठारोगजोतूंतुजाघातानें, २ निरोपानें, ३ मूर्खानें, ४ द्वंद्व, ५ रूपा, ६ भीष्माच्याभाषणांतें, ७ स्वर्गस्थ, ८ सांब, ९ दैत्य. + दवाग्नी

गमलें सैं करिजेनें विंध्यासीं युद्ध काय हेमागें ५५
शक्रें या स्वसेरख्याला पूर्वीं प्रार्थूनि पार्थ भेटविला
याचा प्रताप जैसा लयवातानें लयाग्नि पेटविला ५६
ज्याच्या बळें तुवां त्या सत्पुरुषासीं विरोध हा केला
न वळसि बरें नव्हे हें या ऐशा आमुच्याहि हाकेला ५७
सहज कवचकुंडलबळ- हीन गुरुब्रम्हशापपविदग्ध
अतिरथ नव्हे रथ नव्हे हा केवळ अर्धरथचि अविदग्ध ५८
वधिल विजयशर अमरा वज्रमय प्रोच्चगगनयानींच्या
रक्षूं शकेल येवुनि आड कनकमयहि नग न या नीच्या ५९
स्मित करुनि एवमेतत् द्रोण म्हणे त्या दहांत कुरुगुरुनीं
अपमान असा करितां पाहे तो वीरसिंह गुरुगुरुनी ६०
कर्ण म्हणे भीष्माला रक्षूंद्याची निजप्रपा वदिला
हांतो ईर्ष्याऽसूया- हंकृतिनीं प्रबळहि-प्रभाव ढिला ६१
कां या कुगुणें बुडविसि जें म्हणति तुला भले कुरूपम तें
काय उपाय स्वरूप न व्हावाचि जगत्त्रयीं कुरूपेमतें ६२
जेव्हां तेव्हां करिसी मत्तेजोवध दहांत शांतनवा
शब्देंचि कळे सुज्ञा स्वाभाविक कीं उगाचि शांत नवा ६३
शब्दशरीं विंधुनि त्वां केलें काळिज पितामहा चिरडें
शिकविसिल तूं शिकेलचि याकुरुपनिचा पिता महाधि रडें ६४

---

१ विंध्याचलपर्वतासीं, २ हिमाचलानें, ३ भगदत्ताला, ४ प्रलयकालचेवायूनें, ५ प्र-उच्च-गगन-यान- फारउंच आकाशामध्यें रहाणाऱ्यादेवाला, ६ एवं-एतत्- याप्रकारचें- हें, ७ ईर्षा-असूया- निंदा- अहंकृती-अहंकार, ८ कुरूची आहेउपमाज्यास,

मी साहतों तुझ्या या मित्रसुयोधननृपार्थ अपराधा
शूद्राचें सोंवळेंसा हो सूत म्हणउनि करी सूतप राधा ६५
राया अर्धरथ असें मज म्हणतो हा दहांत आजोबा
साजो बाहुबळें यश जोडुनि यांचेंचि नाव गाजो बा ६६
मृषार्थ वृद्धतरुवाक्- [1]कुसुमांतें मर्त्यनायका वेंच
अतिवृद्ध-पुनर्बाळांचि निःसार तदुक्त नायकावें च ६७
मारीन पांडवां मी आप्ता-आंतुनि अनाप्त हा निवडा
मत्तगज कुशरधरा- पासूनि प्राप्त होय हानि वडा ६८
हा सेनापति घेइल जें जें अर्जुनवधादिमघयश तें
केंव्हा विचार भुलतें थोरपण मन तसें न मघयशातें ६९
आधीं मरेल हा मग मारीन धनंजयास मी परहा
वृद्ध व्याकुळ होतां माडी घ्यायासि यासमीप रहा ७०
भीष्म म्हणे रे नीच्या मंदभयानें मनीं जरि न धरितों
आतांचि वारिजापरि लीलेनें खच्छिरासि मी हरितों ७१
दुर्योधनप्रिय म्हणुनि वांचसि तूं नीचकुलभवा नीच्या
वांचे गजमुखमूषक लंघुनि पंचानना भवानीच्या ७२
गुरुरांहि नाहीं भ्यालों बहुदिन करितां तशांहि समरा मी
सामर्थ्य जरि पहावें तरि साक्षात् कामकाळसम रामीं ७३
केला अपूर्णकाम प्रभु मन्निधनैककाम रामहि ज्यां

१ वृद्ध भीष्म हाच कोणी वृक्ष, याची वाणी, हेंच पुष्प, यातें, २ फार वृद्ध बाल आणि निरर्थक बोलणारे यांचें भाषण, ३ न आयकावेंच, ४ शत्रुहंता, मी, ५ कमळाप्रमाणें, ६ नीचमुलोत्पन्ना, ७ गजाननाचा उंदीर, ८ रुद्रतुल्य, ९ मत्-निधन-एक-काम-माझा वध करणारा हाच आहे एक काम ज्याचा

हरिल्या काशिपतिसुता[1] सांगों तुज काय पामरा महिम्या ७४
लाजविली जिंकुनि महि- पति पंदरुची जरी तसी महिम्यां
राहो तें वाखाणिल सद्रसना[2] आपुल्या कसी महिम्या ७५
भूप म्हणे भेद नसो म्यां हा केला तुम्हांसि अंजलि हो
तुमच्या प्रसादविधिचें मद्धाळीं विजय पाणिकंज[3] लिहो ७६
प्रामहत्कर्म तुम्ही दोघेहि मदामतम कराल पणें
भासाल शत्रुसेना- नयनाला रुद्रसम करालपणें[4] ७७
प्या स्वजनार्थ क्रोधा जेविं विषा विश्वनायक[5] पियाला
नरचि विवेकें कोपा वारी वारील काय कपि[6] याला ७८
इकडिल जरी तरी मज निकडिलहि रथातिरथकथा सांगा
न भल्या दुरुक्ति देती यापरि हृदयांत न व्यथा सांगा[7] ७९
भीष्म म्हणे सकलरथा- माजि महोदार धर्मसुत पाहो
तज्ज्ञामरबळहि[8] म्हणे इकडे क्रोधें न धर्मसुत पाहो ८०
सर्वारथांहुनि अधिक बाहुबळेंकरुनि भीम आठपटें[+]
तत्तनुसि लढ्द जरि गगनाची झांकितील पाठ पटें[*] ८१
माद्रेय रथी परि त्या तृणसम रथ पत्ति नाग राऊत
येईल तत्प्रताप- ज्वलदग्न्यतितमसागरा[9] ऊत ८२
अर्जुनसम वीर नसे मागें आतां पुढें न व्हायाचा
हा वीररसौघ नगाहि न उरेल उरेल जो लव्हा[10] याचा ८३

१ कन्या, २ साधूंचीजिव्हा, ३ हस्तकमळ, ४ विक्राळपणानें, ५ शिव, ६ वानर, ७ स-अंग- देहधारी, ८ तत्- ज्ञ- अमर- बळ- धर्मतेजानें जाणणारें देवसैन्यही, ९ त्या त्यापराक्रमरूप प्रज्वलित अग्नीनें अतितमसागराला, १० नम्र, + अष्टगुणित * वस्त्रानें.

होवूनि वज्रपंजर रक्षितसे वासुदेव कीरो या
तत्संगतिहुनि त्याला बहु न यशोदा न देवकी राया ८४
दिव्यरथ दिव्यशस्त्रें दिव्यकवच दिव्यसूत कंसारी
ज्याचें साहित्य असें त्यावरि जाईल कोण संसारी ८५
जाइन मी कीं जाइल गुरु जाइल कोण जिष्णुवरि तिसरा
प्रतिभटहृदया नच्छर तेविं क्षुतृषितहि न पांथ वारिति सरा
परि आम्ही म्हातारे राया तो श्वेतवाह तरणा रे
काय इतर तरतिल जल- निधिसि कसे जे नदीसि तरणारे ८७
दावील किति स्थविर गुण पिकतो तरु तरुण कीं जरठ पिकतो
पटु त्यापुढें वदेसा कवण रण-वसंत-आम्र-हरि-पिक-तो ८८
सर्वमहारथ पंच भ्राते जे द्रौपदेय ते ज्यांतें
आदर्श म्हणति पांडव दाखवित्यां स्वगुणरूपतेज्यांतें ८९
रथयूथपयूथप अभि- मन्यु स्मरारिस्मरज्ञताहि असकृगम तो
औ समगुण पितृमातुळ- हृदयासि बहिश्चर स्वअसकृगमतो ९०
सात्यकिही रथयूथप- यूथप वृष्णींत तो असामान्य
आप्तांत अर्जुनास श्रीकृष्णासहि नसे असा मान्य ९१
द्रुपद विराट महारथ आणूनि मनांत धर्म नय नानें
वृद्धहि करुनि पराक्रम निर्वाहितिल रणांत धर्मनयनातें ९२
द्रुपदकृत- शिखंडी तो रथसत्तम होय पुत्र दुसरा ज्या

१ पिंजरा, २ पोपटाला, ३ मर्त्य, ४ मार्गस्थ, ५ सरोवराला ६ युद्धरूपवसंतामध्यें कृष्णरूपआम्रवृक्षावर अर्जुनरूप कोकिळा, ७ आरसा, + अर्जुनावर, ∗ समुद्रासि, ‡ नदीसि. ‖ उत्तमरथी.

धृष्टद्युम्न म्हणति तो   अतिरथ हें सत्य गुरुसि पुस राजा ९३
कथुनि रथातिरथ म्हणे   सर्वांसी मी करीन युद्धातें
परि न शिखंडिसी कीं   बा योग्य नव्हे मला विरुद्धातें ९४
कुरुपति म्हणे निराळा   कां एकचि वीर हा निवडिला हो
हरि ला हरिणापासुनि   तरि त्यापासुनि न हानि वडिलां हो
भीष्म म्हणे म्यां कन्या   हरिल्या भ्रात्रर्थ काशिराजाचा
मुनिजनांहि ज्यांसि भुलला   वरि दिसती सकळिका शिरा ज्यांच्या
बहुसंख्य आडवे मज   झाले दुर्योधना नरवरा जे
क्षमले सहावया या   चापगुणाच्याहि ते न रव राजे ९७
बहुसंख्य भूप जिंकुनि   म्यां स्वपुरा आणिल्या तिघी कन्या
ज्येष्ठा अंबा वदली   वरिला शाल्व न वरीन मी अन्या ९८
शाल्वाकडेचि ती म्यां   पाठविली अंबिका स्वभावातें
अंबालिकाहि दिधली   विचित्रवीर्या शुचिस्वभावातें ९९
अंबेला शाल्व म्हणे   जा गंगासूनुची च नवरी हो
परविजिता परपूर्वा   ऐसा ठेवूनि दोष न वरी हो १००
भीष्मपरिग्रह कीं तूं   करितीस स्वपरघात कां पावें
मी काय तुजकडे मन   जातां जगदंतकेंहि कांपावें १०१
ऐसें शाल्व वदे ही   बहुतविनविताहि तो न मूढ वळे
आठवुनि जिंकिल्या मज   ती कोपें जाय रिपुचमू ढवळे १०२
वरिलाचि मनें व्हावा   परि त्या ती वायको नको पतिला

१ सिंहाला, २ मुनिजनाच्या शिरावर दिसती- रुद्रा ह्रुजरी, ३ ज्येष्ठा, ४ पाणिग्रहण, ५ जगत- अंतक- यमानेंही.

आला तहूनें बहु  याहि असें आयकोन कोप तिला  १०३
रडतचि तपोवनाला  गेली पावोनि उग्र ताप सती
मजवरि दोष स्थापुनि  वृत्त कथुनि करि सखेद तापस ती १०४
त्यांसि म्हणे पावेना  दीन भल्याच्या पदासमीप दरा
माहेर हेंच द्या वर  हाच पसरिले पदास मी पदरा  १०५
सांगा तो धर्माला  ज्या धर्में वर्ततात संन्यासी
अन्यासि प्रेक्षीना  वर्तेन स्तरें वनांत वन्यांसी  १०६
ज्या आश्रमांत जातां  अनितप्ताचाहि सर्व ताप सरे
त्या आश्रमांत झाले  तत्तापें तप्त सर्व तापस रे  १०७



## अध्याय १३

राजर्षि होत्रवाहन  भृगुरामाचा सखा तिचा आजा
तो पातला अकस्मात्  तीर्थतपःपर जसा भरत राजा  १
तो तें परिसोन तिला  अंकीं घेऊनियां मुनिजनातें
सांगे दौहित्री हे  ऐसें होवूनि साश्रु निज नातें  २
अंबेसि म्हणे वत्से  राम अधित्यनि असे महेंद्रागा
जा सांग नाम माझें  त्या प्रभुसचि गा न तूं महेंद्रा गा  ३
तोंचि अकस्मा तेथें  अकृतव्रण पातला रहायास

१ प्रीतीला, २ पहाणारनाहीं, ३ वनांतील तापसांशीं  ४ कन्येचीकन्या, ५उदकपूर्णनेत्र, ६ महेंद्रपर्वतास. ७ इंद्राला.

तो सांगे राम-सखा  येणार उद्यां तुला पहायास  ४
अकृतव्रणासि अंबा  वंदुनि निज दुःख सर्वही कळवी
तैसीच लोपस दावुनि  स्फकृताचा नद्या तया वळवी ५
रामहि दुसरेदिवशीं  भेटे निवडूनि घे स्वकाय कवी
नायक वीरांचा जो-  त्या तो-राजर्षि सर्व आयकवी  ६
येती शरण तुला जे  ते जन सर्वत्र सत्पदा वरिती
ऐसें प्रार्थुनि जोडी  अंजलि घालूनि तत्पदावरि ती  ७
राम म्हणे वत्से तूं  आजवळा पावलीस न वनातें
जें राजर्षिकडे या  ब्रम्हर्षिकडेहि तेंचि तव नातें  ८
अश्रु पुसोंदे वांछित  सांग मज अनाथसी नकोंचि रडूं
आम्हांसि आपणासह  या दुःखमहाभरें नको चिरडूं  ९
अंबा म्हणे असें हें  झालें किति कथिल दुःख हे तूतें
मारावें भीष्मानें  या माझ्या परमदुःखहेतूतें  १०
भीष्मापुढें करावें  बळ शाल्वें काय काय मत्तातें
आजोबा राजो वा  यश मारीं त्या अतिप्रमत्तातें  ११
राम म्हणे न धरिन धनु  जरि न विनवितिल मजप्रति ज्ञाते
ब्राम्हण-कार्या-वांचुनि  सोडावी कसि निजप्रतिज्ञा ते  १२
अंबा वदे प्रतिज्ञा  शरणागतरक्षणार्थ सोडावी
तुज ईश्वरासि दुष्कर  काय प्रभुजी स्फकीर्ति जोडावी  १३
राम म्हणे वत्से तुज  भीष्म नमिल बहुमता मदाज्ञा त्या

---

१ परमदुःखाला कारण अशा भीष्मातें, २ माझ्या बापानें, ३ भीष्माला, + माझी आज्ञा, ॥ इच्छित, ‡ मदोन्मत्तातें.

लंघ्या नव्हे प्रतिज्ञा प्रतिपाल्या होय हे सदा ज्ञात्या १४
काश्या म्हणे वधा कीं भीष्म म्हणो निर्जितोस्मि आजोबा
माजो बाहुबळें न छात्र बहु गुरुप्रताप साजो बा १५
अकृतव्रणहि म्हणे जी वर्गुत भृगुकुळगुरुप्रति ज्ञानी
स्मरली मज स्मरावी रचामानींही गुरु प्रतिज्ञा ती १६
वदला म्यां शरणांगत दंडुनि विप्रादि सर्व तारावा
जो सर्व क्षत्र रणीं जिंकील प्रबळ तोहि मारावा १७
भार्गव म्हणे विसरलों होतों कामींहि या प्रतिज्ञाता
वत्सा तुज धन्य म्हणो आधीं मग सर्व याप्रति ज्ञाता १८
सामंचि कार्य होइल जरि तरि युद्धासि काय कारण हो
न करील वचन जरि तरि माराया भरतनायका रण हो १९
ऐसें योजुनि घेउनि त्या मुनिमित्रांसमेत मुलगीतें
प्रस्थान शीघ्र केलें त्या राजामरमहर्षिकुलगीतें २०
येऊनि कुरुक्षेत्रीं राहे सांगोनि पाठवी राजा
धांवोनि भेट लोमीं- वेद धनुर्वेद पाठ वीरा-ज्या २१
प्रत्कृतपूजन घेवुनि राम म्हणे रे सुरापगांगभवा
प्रत्यर्पित बहु नाहीं तरि काय असें दुराप गांग भवा २२
गरुडें सुधा तसी त्वां हे अंबा रणकरुनि जरि हरिली
तरि हरिली नमनिजनें संसृतिरुचि तोवि केवि परिहरिली २३

---

१ सिद्धीसचन्यावी असीहोय, २ काशिराजाचीकन्याअंबा, ३ प्रतिज्ञेला, ४ मजप्रति, ५ राजर्षि-देवर्षिप्रमुखानीं गीतअशा रामें, ६ सुर-आपगा-अंग-भव-गंगापुत्र, ७ दुष्प्राप, ८ गंगोदक, ९ शिवाला, १० संसाररुचि, ११ टाकली.

वदलों सत्य स्मात्या- करितां हरिली बळें पर स्वामी
वरिला शाल्व म्हणे हे घेऊं जाणुनि कसें परस्वा मी २४
राम म्हणे शाल्व न घे मानी हरि गज परें दिला न वरी
त्वां जिंकिली यदर्थे त्वद्भ्राता तो करू इला नवरी २५
मी वदलों जें दुष्कर सुयशस्कर सांग काज रामा तें
होइल अकीर्ति देतां कां हा उपदेश काजेरा मातें २६
राम म्हणे त्वद्गुरु मी माझें सुखपुण्यकीर्तिजनक वच
गुरुवचनासचि म्हणती सर्व भले पुण्यकीर्ति जन कवच २७
मी बोलिलों असें तो न घडेल कधीं दयानदा पावें
गुरुनें ज्यासि अधर्मा- चरण न मानें तया न दापावें २८
राम म्हणे होय सुखी निजगुरुचें वचन शिष्यजन करिता
नातरि गुरुकुंभभव- क्षोभें छात्रामृतांशुजनक रिता २९
हे सर्वमता साक्षात्- दुर्गासी सर्व कामदा ज्ञात्या
लंघील खळ महिषसा जो नकरिल भस्म कां मदाज्ञा त्या
झाले पशुचि न वाहुनि शृंगा पुच्छा वळी मुढ राजे
तैसे ते न क्षितिवरि आढळले न वळले कुठारा जे ३१
मज गुरुपुढें असें तो न घडेल कधीं असें कसें वदसी
असतां समर्थ अघटित- घटना-पटु मत्कुठार हा सदसी
खचसील कौरवा तूं कीं बहु चढला तुझा मद सिंगेलीं

१सिंह- यानीसिंह परें दिला गजन वरीइत्यन्वय, २विषरूप, ३निजगुरुचें वचन करितां शिष्यजन, ४गुरु रूप अगस्ती च्या क्षोभानें, ५शिष्य रूप जो चंद्र जनक- सागर तो रिता होय, ६कुराड, ७विवाह, ८अघडणारें तें घडविण्याविषयीं कुशल, ९सत्- असितरवार, १०मापावरचीशींग.

लंघावया पहारी गांवाला काय रे मदरि गेला ३३
वधिले क्षितितळवर्ती- क्षत्रिय म्यां एकवीसदा सारे
माझा प्रताप गातां रुद्रभ्रम दे कवीस दारा रे ३४
ऐसें भलतेंचि वदे वर्णावा मुख्य जो गुरु गुरूनीं
पाहे राम मजकडे जेविं हरिकडे हरी गुरुगुरूनी ३५
वदलों धर्म-न्यायें हा देह तपोवनांत राबोवा
त्यजुनि दुरभिमान धरुनि- शांतिसि तारुनि जनांतरा बावा३६
ठाव्या आहेत मला गंगा गोष्टी यथेष्ट अन्या या
तरि भय भल त्यापासूनि होइल जरि मी करीन अन्याया३७
वधिले क्षत्रिय तेव्हां नव्हता हा भीष्म शांतेनव समज
देवारि मागते ते झाले मरणीं करूनि नवस मज ३८
गेलें गुरुत्व तुमचें कां हो म्हणतां वधीन अनघातें
येइल पदरांत कसें यश धर्मन्यायनिष्ठजनघातें ३९
सच्छिष्याला विद्या गुरु शांतायासि कायहो शिकवी
पांडित्य पहा माझें पाहोनि मला म्हणाल होशि कवी ४०
हांसूनि राम म्हणे रे हितकर गुरुवचन कां न आइकसी
साहेल तुझी तुजिया दुःसहशोकानेंलागि आइ कसी ४१
भीष्मा मज सिंह गणीं वेड्या तूं आपणासि कलभ गणीं
न रविपुढें मिरवेसें चंद्रींहि कसें असेल बल भगणीं ४२
देशिल सत्यवतीतें शोक बहुत रडविशील गंगेतें

१ वरावाया, २ शांतनूचापुत्र, ३ माझेवडिल, ४ अघरहित- निष्पाप्या, ५ अतिदुःखा ग्नि, ६ हत्तीचाछावा, ७ भगण- नक्षत्रगणांत.

समज बरें मददूषित जें जें तेज क्षणांत भंगे तें ४३
हो सिद्ध ये हरीनें- व्यसु आला-तो-करेणु केला हां
हो गंगेला शोकद तोरवद हें तोकं रेणुकेला हो ४४
सिंधूंत नग जसा कपि तैसा पाहोनि गर्वनग रामीं
वंदुनि येतों ऐसें बोलुनि आलों फिरोनि नगरा मी ४५
सत्यवतीतें सांगुनि नमुनि तदाशीः प्रसाद घेऊन
हा गुरुचें दर्शन घे हेमंतीं जेविं अधन घेऊन ४६
आम्हां गुरुशिष्यांचा अत्यंताद्भुत पहावया समर
आले बहु सुरराज- ब्रम्हर्षिसमेत सर्वही अमर ४७
पुत्रस्नेहें मातें ये वाराया भिऊनि देवधुनी
हनु धरुनि म्हणे वा हा काळकरीं बहुभटांसि दे वधुनी ४८
अनुभावें न जितावें भावें गुरु देव सर्वथा पटुनीं
उठविति अनर्थ स्वजनां रिझतां पुरुषार्थ सर्व थापटुनी ४९
सांगोनि कलहकारण वदलों गंगे वृथा न कोपावें
रामापरि मज तूं ही निजधर्मच्युत करूं नको पावें ५०
सुतजीवदान मागे पसरुनि रामा नदी नतो पदर
नमुनि म्हणे शरण तुला येनां पावे न दीन ताप दर ५१
आग्रह कां करितां हो प्रभुजी द्या अभय बाळका पावा
न गिळी कटुकरस म्हणुनि कोप करुनि काय बाळ कापावा ५२

१ प्राणरहित, २ हत्ति-त्याचीस्त्री, ३ हर्षदेणारं, ४ बालक. ५ माझ्यामातेला, ६ मारुति, ७ तत्-आशीः-आशिर्वाद-प्रसाद, ८ थंडींत, ९ दरिद्री, १० सुरर्षि, राजर्षि, ब्रम्हर्षि, यांसह, ११ गंगा, १२ हनुवटी, १३ नम्र होतसाती;

राम म्हणे गंगे जें विद्यादिगुणेंकरूनि मातें तें
दावी वंध्येहुनि बहु कर्दपत्य उणेंकरूनि मातेतें ५३
या ऐशाही गुरुचें जो वेदवचन सरवे वच न मानी
तोहा मानील कसें तुज गुरु मानुनि तुझें वचन मानी ५४
करिमां आज्ञा त्याच्या स्पर्शेन शिरा सुरापगे हातें
त्यजिल मदाशी साध्वी नाहींतरि त्या सुरोप-गेहातें ५५
रक्षावाचि सुत असे- लच्छित्तीं जरि असे महाभागे
गंगे जा वांदवरि आण अभय द्यावया न हो भागे ५६
पुनरपि माय मज म्हणे न विलंघावें धरूनि हट नातें
गुरु हरि हर बहु रतले गुरुचरिताच्या करूनि पठनातें ५७
शक्तदा उपदेशौषध हा संरक्षावया स्वसुत पाजी
तो कां विटेल वेंची नित्य पतितशतहिता स्वसुतपा जी ५८
अत्याज्य सुप्रतिज्ञा- ग्रह निजकुलधर्म सन्नय नरा हे
तैसें करें करावें जेणें एकहि न सन्नयन राहे ५९
सिंधु म्हणे कोण असा माता जोडील हात पोराशी
शिष्य. असा मग आग्रह केसा सोडील हा तपोराशी ६०
जों माय म्हणे देइल हा हरि तुज मुग्धसिंधुरा मरणा
मजवरि येता झाला तोंचि यशोदुग्धसिंधु राम रणा ६१
वैसा रथीं कवच द्या ऐसें म्हणतो म्हणें उणें काय

१ दुष्टअपत्य, २ सुर-आपगा- हे भागीरथी, ३ मद्यप, ४ मार्गा वर आण, अशीम्हण आहे, ५ मी राम, ६ उपदेशरूप औषध, ७ शेंकडोंपातक्यांच्याहिताला, ८ त्यागालाअयोग्य, ९ दृढप्रतिज्ञेचाआग्रह, १० बालिशगजाला, ११ यशोरूपक्षीरसागर.

पूर्ण असे हा माझा चिंतामणिकादि गुरुगुणें काय ६२
रथ भूमि वेद वाजी गायत्री कवच सारथी वान
या साहित्यें आम्हां काव्यऽधिक कोण जोडिना हान ६३
ऐसें वदतांचि दिसे दिव्यरथीं दिव्यकवच तो हरसा
मोहे देवांची ही मति केवळ पावली न मोह रसा ६४
ठेउनि चाप करींचें उतरूनि रथावरूनि पद नमुनी
मम जयमाशास्व असें प्रार्थियला कीर्तिकेलिसदन मुनी ६५
मज राम म्हणे नमन न- करितां करिताचि हानि ज्ञापानें
वंदावा गुरु हर्षद अमळद्विजराज हा निशापानें ६६
भीष्मा मजला म्हणसी जरि जयमाशास्व मे-विभो राम
तरि संप्रति जैसा तूं जयकाम तसाचि होहि जयकाम ६७
झालों प्रसन्न मी या त्वच्चरितें तूंचि रूढ समयज्ञ
हूं बैस रथीं घे धनु सत्फलद न अन्य युद्धसम यज्ञ ६८
नमुनि रथीं बैसुनि मी वदलों गुरुजी न हार नत पाहो
तुमच्या न ब्राम्हण्या न श्रुतिवृंदा प्रहार न तपा हो ६९
स्वीकारिला तुम्हीं जो असमुचित-क्षत्रधर्म साधूनी
खंडीन त्यासि होइन सन्मत हें साधुकर्म साधूनी ७०
करिता झाला मजसीं माझा गुरु राम संगरारंभा
पाहों ये योगिचमू जसि सोडुनि कामसंगरा रंभा ७१
प्रथमचि सोडी मजवरि मद्गुरु शरवर्ष कायहानिकर

---

१देह, २पृथ्वी, ३मम-जयं-आ शास्व-माझा जयाची आशा कर, ४यशःक्रीडेचें मंदिर, ५चंद्रानें, ६मे-विभो-माझ्या प्रभो, ७अयोग्य, ८माझा गुरु, ९शरीराची हानि करणार.

तैसेंचि ह्मांहि शिष्य  प्रेक्षक जन म्हणति काय हा निकर ७२
झांकिति समरीं शतदा  आम्हां देवर्षि सत्वरसूनगणीं
निज-वीरसूत्व निरुपम  सुकृतफळ परंतु मत्वरू न गणी ७३
बाणांहीं मी गुरुच्या  गुरु माझ्याही करी रथा पिहित
शस्त्र-प्रहार यद्यपि  अहितचि गमलें मना तथापि हित ७४
प्रथमदिनीं म्यां गुरुच्या  धनुची पण करुनि तोडिली कोटी
मजवरि तीक्ष्णशरांची  गुरुनें कोपोनि सोडिली कोटी ७५
पळमात्र पावली शर  मर्मीशिरतां मदीय तनु कंपा
नाहीं गडबडलों कीं  मजवरि गुरुचीच पूर्ण अनुकंपा ७६
मग मी झालों गुरुच्या  मर्मी शतसंख्यबाण शिरकविता
संधानशक्ति माझी  कांपवि तत्हृदय जेंवि शिर कविता ७७
क्षण मूढसाचि झाला  क्षतजें प्रभु न्हाणिलाचि भल्लांनीं
मल्ला निष्क्रिय केलें  जाणो कवळुनि अनेक मल्लांनीं ७८
हा रे भीष्मा मंदा  जपला गुरुवत्सलव्रता कुरु ज्या
तें बुडविलें तुवां कीं  हा न कुसंतति भली भली कुरुज्या ७९
गुरु हरिहर कीं धिक् त्वां  कोणि न करवेल लांडग्याला जें
दे जीव जा भल्याला  दावाया तोंड दांडग्या लाजें ८०
असि आपलीच आपण  केली निंदा बहु प्रथम-दिवसीं
कीं विप्र पुरोडाश  क्षत्रकुळें त्यांपुढें जसीं दिवसीं ८१
दुसरे दिवसीं मजवरि  शस्त्रें अस्त्रें हि तें गुजें योजी

---

१ पहाणार, २ पुष्पवृष्टीनें, ३ माझीमाना, ४ आच्छादित, ५ धनुष्याचें अग्र, ६ कृपा, ७ कुत्सितरोग, ८ त्वाम्-धिक्-तुलाधिःकार असो, ९ हुतशेष, १० पिठाचे दिवे.

तेव्हां वदलों स्वामी हें केलें भग्न म्यां दुजें यो जी ८२
मज डावलूनि मद्गुरु भेदी भल्लें करून हें उर तें-
सांगों-काय तुज नृपा नसती श्रीगुरुकृपा न हें उरतें ८३
मत्सूत मला मागें मूर्छा येतांचि तत्क्षणीं काढी
बा दीर्घ वेदना अनु- भविल्या समरीं परंतु ती गाढी ८४
मागें हळूच मद्रथ सारथि ने जंव्हि हरींस न पिटाळी
मेला खळ म्हणुनि पिटिति सुनि रामजयीं जसेचि कपि टाळी
अंबेचा तर्क किती पिटिती अक्षतव्रणादि-कवि टाळी
हा हा देवहि म्हणती गुरुचि निजगभीरतेसि न पिटाळी ८६
रामाश्रितसाधूंची दूर करी गर्जनाचि मन्मोहा
माय म्हणे रडवाया न परसतीच्या कुशींत जन्मो हा
म्यां सावधान होउनि रथ फिरवुनि बाण सोडिले बहुत
रामप्रतापदहनीं[1] झालेचि न लागतां विलंब हुतें[2] ८८
मग म्यां मूर्छित केला काळोग्रशरव्रजें[3] उरोनिहितें[4]
गमलें यावरि न करील गुरु शिष्यांचीं जगीं उरोनि हितें ८९
यागूनि घेतलें गुरु देवा म्यां आंग कांपत नमुनि तें.
बसला अशनिसम उरीं शर मग व्हावें न कां पतन मुनितें ९०
कल्पांतीं भानु तसा रामपडे भूवरी रथावरुनी
घालूनि उडी अक्षत- व्रणसूत धरी शरीर धावरुनी ९१
जल वायु घालिती किति किति जपती शांतिसूक्त तापस रे

१ रामाच्या प्रतापरूप अग्नींत, २ होमद्रव्य, ३ कालाप्रमाणे उग्र शारसमुदायानें, ४ वक्षस्थलीं मारलेल्या.

यत्नशतें चिरकाळें हळुहळु भृगुराम गोंदृताप सरे ९२
उघडुनि दृष्टि गुरु म्हणे भीष्मा माझ्यासमोर चि रहा रे
ज्याही भुजगारींसीं करितां संगर न मोर चिर हारे ९३
मत्पाश्वीं मज हाणी मेलासि असें म्हणोनि रोपानें
कोपानें क्षत्रेक्षत- जांची आला करीत जो पोनें ९४
चुकलें देवें देह न त्या आघातीं रणीं रहावा तें
झालों सकंप पळभरि होय महातरु जसा महावातें ९५
कांपविले शर मर्मीं हाणुनि माझे भृगू दृहें घोडे
मोडे धैर्य न त्याचें तेजस्वी शोधितां नसे थोडें ९६
गुरु खवळलाचि होता मींहि बहु तसा कधींच न खवळलों
एकामेकांवरि मग साक्षात् कल्पांतमेघसे खवळलों ९७
वांतास कीं शिरायां न दिली पदवी रविप्रकाशाला
इतरां मींच न होइल मग तापद वीर विप्र काशाला ९८
शर कोंदले नभीं बळ-त्यांचें अन्योन्य-खंडनीं न चले
नच लेश उरे स्वोत्थ- ज्वलनें होवूनि दग्ध ते खचले ९९
उतरी संध्याकाळीं नित्य स्वधनुर्गुणासि कवि राम
मूर्छेविना न आम्हा- मध्यें प्रेक्षकजनाहि न विराम १००
म्यां त्या समरमखाच्या प्रारंभीं स्वगुरुचे सदा चरण
अवसानींहि नमावे कीं मज हें बहु रुचे सदाचरण १०१
तिसरे-दिवशीं केला जो दिव्यास्त्रप्रयोग तच्छमना

१ बाणानें, २ क्षत्र- क्षत-ज- क्षत्रियांच्या रक्ताची, ३ पाचान ४ स्व- उत्थ- ज्वलनें- आपणापासून उत्पन्न अग्नीनें, ५ युद्धयज्ञाच्या, ६ तत्- शमना- त्याच्या शांती करितां.

करिता झालों राया कीं मी गुरुदेवभक्त अच्छमना १०२
गुरुनें जी पाठविली मग कृत्याशीच शक्ति बा राज्या
ती त्याहि खंडिल्या म्यां आल्या अत्युग्रशक्ति बारा ज्या १०३
पुनरपि सोडुनि शक्ति प्रकटी दिव्यास्त्र तें न कथवे गा
मद्रथवेग गुरुपुढें किनि करिता रुद्ध भानुरथवेगा १०४
खरतर शर प्रकटले जिकडे तिकडे अनंत राजा रे
खंडाव्या किति तरि त्या शक्तिशरतती अनंतरा ज्या रे १०५
सतुरगसारथिरथ मी झालों झाक गुरुशरौघ पंजरसा
शर शिरकले शरीरीं कंजीं अलि शिरनि जेविं कंजरसा १०६
मद्रथरत्नीं शिरलं बहुत शिलीमुख जसे कुशालय वनीं
कीं सर्वस्व हराया तस्कर बहु ज्या घरें कुशाल भवनीं १०७
सरहि सुरडितां चुकलों म्हणउनि मग कां न कान नर होतें
रे कायदवाग्निपुढें पसरूनि दुकान कानन रहातें १०८
तेव्हां जें केलं तें कथितों सादर कथेंत मन घाला
विव्हल करिता झालों मी मजहुनि फार त्याहि अनयाला १०९
उरलों विकळहि होउनि तिरसा तो वेंचलाचि अस्ता गा
राहे रण प्रकाशा आटोपुनि मित्र जाय अस्तांगा ११०
चवथे दिवशीं संगर संगरहितबुद्धि तो करी राया
मारुनि मत्सूतातें उरवी शरसर्प शत शरीरा या १११

१ शक्तीचा आणि बाणाचा समुदाय, २ कमळीं, ३ बाण, ४ दुष्ट टोळ, ५ चोर, ६ कान उपटून घेतीं, ७ अयनाई ज्यास- निष्पाप्याला, ८ सूर्य, ९ अस्ताचलास, १० युद्धांत चिहित आहे ही बुद्धी ज्यास, + भ्रमर, ✱ मकरंद.

अतितेजस्वीषुवरें   मस्थ्दया होय तो विदारविता
तत्काळ मला आली   शशिता त्या युद्धकोविदा रविता   ११२
रथावरूनि बाणा-   घातें उसळोनि पावतां पतन
वरिचेवरि भव्यपुरुष   आठ करिति सांवरूनि मज जतन ११३
ते एकदांचि वदले   मोपेः स्वस्त्यस्तु-ते असें हित रे
झालों स्वस्थ सदुक्तें   सर्वहि संकट असो कसेंहि तरे ११४
त्यांविप्रांसि नमुनि म्यां   पुशिलें कीं रण पुन्हा करूं निकरें
बसतों तों माय रथीं   आहे मत्तुरगगुण धरूनि करें ११५
गंगेसि नमुनि वदलों   मत्सारथि तव कृपाकटाक्ष महा
याचि बळें दिगिभांच्या   आहे भेदावया कटा क्षम हा ११६
आशी तुजी समर्था   रचन्यूना त्वां इला न लेखावें
देखावें कुतुक परें   देवीसिंहासि काय गें खावें   ११७
देवसतींत विमानीं   बैसोनि रूरूवें दुरूनि समर पहा
गुरुवर सारथि ज्याचा   त्यासी पाडुनि म्हणेल अमरप हा
वरितील मजचि रूयशें   लोकीं हरिपादनखरूते जितकीं
बहु माच्छिरी-निषंगीं   गुर्वाशीर्वादशैर रूनेजित कीं ११९
तरसील द्विभुज कसा   यासि न समरीं सहस्रबाहु तरे
बहु झाले या मूर्त-   प्रलयज्वलनीं पडोनि बा हुत रे १२

---

१अतितेजस्वीजोइषुवरतेणें, २ युद्ध-कोविद-युद्धाविषयींनिपुण, ३मा-भैः-स्वस्ति-अस्तु-ते-भिऊंनकोतुझें कल्याणअसो, ४ दिक्-इभ-दिग्गजांच्या, ५ गंडस्थळ, ६ आरण्यापेक्षाकमी नकोमानू, ७ इतरासि ह्यानें, ८ इंद्र, ९ हे हरिचरणनखकन्ये गंगे   १० माझें शिरहाचनिषंग-भाता,यांत, ११ गुरूचे आशीर्वाद हेच शार, १२ सहस्रार्जुनराजा.

ऐसें वदे रडे तनु- ज[1]प्रेमाचा न आवरे उत रे
मज आलिंगुनि हुंगुनि माथा माता रथावरुनि उतरे १२१
सारथ्य युद्ध तांडव शस्त्रास्त्रपयोधरागुरु समोर
करिताझालों मीच न केलें म्यां स्वर्गगा[2] कुरुवर मोर १२२
जोडुनि कर सोडुनि परे- सर्पप्राणांतका- शर-मोरा[3]
झालों विदारिता मी केवळ यमसन्निकाश रामोरा[4] १२३
क्षितिसह गुरुतनु कांपे पावे उल्कासमान[5] पतनातें
रक्षिति सर्वस्वें मुनि सर्व जसे धृतिमंत वतनातें १२४
जलधींत बुडे कीं त्या शकला न सरव्यावरि अर्क गरवाया
मित्रत्व हें चि द्याया कीं लागे अन्य शर्करा गया १२५
ऐसें तेवीस दिवस झालें युद्ध त्रिलोकमोहन हो
म्हणतांचि होतों देवा समर्यां समरक्रतूंत[6] मोह न हो १२६
चिंताकुल मी निजलों प्रार्थुनि पितृविप्रदेवता गया
ते पूर्वदृष्ट[7] आले स्वप्नीं मज विप्र देव तारया १२७
वदले पिऊं नको गा भीष्मा प्यालासि कां महाबाहो
स्मरसील प्रस्वापन[8] त्या अस्त्रें सिद्ध काम हा बा हो १२८
निजला तो मेलाचि प्रस्वापास्त्रें गुरूवरि मार करा
तारक साचा गमसिल अस्त्रें संबोधनें न मारकसा १२९

---

१ पुत्रप्रेमाचा, २ स्वर्गींगेलेला, ३ शत्रुरूपसर्पाचा काळ बाणरूपमोर, ४ रामाच्याउराला, ५ निघालेलीज्वालाविद्युत्यादि, ६ युद्धयज्ञांत, ७ पूर्वीपाहिलेले, ८ अस्त्राचेंनाव.

वर्णावा सदनुग्रह   किति झाला फार तो विसावा हो
जागा झालों आला   युद्धाचा दिवस चोविसावा हो   १३०
मग तुमल लोमहर्षण[1]   अद्भुत युद्ध प्रवर्तलें बा गा
झाला असेल कंप   क्षितिकंपें क्षितिधरा महानागा   १३१
पूर्वदिवसप्रहार-   क्रोधें तो क्षत्रकुळ+महाशत्रु
बहुशक्ति शक्ति सोडुनि[3]   फोडुनि टाकी मदीय हें जत्रु[2] १३२
विमला ऽतुळबळसागर   घागरभर रक्त ओकवी राया
तेव्हां मेलाचि असें   मानिति जन सर्व लोक वीरा या १३३
त्यां रोविला ललाटीं   शृंगापरि शार धरुनि आवांका
कोपें मनांत वदलों   गुरुजी आतां करूनि आ वांका १३४
हाणी गुरु शार कठिनाहि   माझें त्या रुकढिना न वक्ष तरे
पडलों क्षितिवरि जाणों   झालें बाळासि तें नव क्षत रे १३५
आली संज्ञा बसलों   स्वरथीं झाल्या विपीन शक्ति मती
मग शक्ति हाणिली त्यां   श्रीरामभुजांतरांत शक्तिमती १३६
स्वरथावरूनि मूर्च्छित   होउनि मुनिवीरमुकुटमणि खचला
उचलुनि सूत म्हणे यश   गेलें कीं खळवधार्थ अणिख चला
मोह हरुनि देउनि कर   अक्षतव्रण सारथी रथीं चढवी
कढवी क्रोध मनीं बहु   योजावें ब्राम्ह-अस्त्र हें पढवी १३८
ब्रम्हास्त्र योजिलें मग   मज भस्म करावया रुचिकथानें

---

१ रोमांचउभारणारें, २ कंठदेश, ३ निरुपमबळाचासागररूपराम, ४ उर, ५ शुद्धे, ६ बलवत्तरा, ७ पवित्रआहेत कपाळ्याच्या, + राम.

जन म्हणति बळें शिरला पाजावा काय हा रुचिक थानें १३९
अनघा बरवा न असा अत्युग्राचार अननघा बरवा
त्यजिलें भक्तपपण पुन्हा स्वीकारुनि साधुमन न घाबरवा १४०
गुरुकर्म गुरुप्रिय मी करिता झालों तसा न होत्सा हें
ब्रम्हास्त्रावरि त्यांहि ब्रम्हास्त्रचि योजिलें महोत्साहें १४१
ब्रम्हास्त्रद्वयतेज व्योमीं व्योमगजनां न फटकों दे
सर्वत्र तें तृणीकृत कल्पांतरुषितसहस्त्रफट कोंदे १४२
देवर्षि ब्रम्हर्षि क्षत्रर्षि व्योमभूमिचर सारे
झाले सतप्त गमला हा गुरुहि क्रुद्ध शुद्ध हरसा रे १४३
म्हणति नपरश्वर आम्हीं सोडुनि कोणीकडे नपा जावें.
बापा ब्रम्हस्त्रातें आम्हां शरणागतां न पाजावें १४४
मज पतनीं रक्षाया करिती जे विप्र आठ वेगातें
त्यांहीं कथिलें होतें जें प्रस्वापास्त्र आठवे गा तें १४५
अस्त्र स्मरसील असा देती ते विप्र आठ वर हा या-
तो हेतु होय समयीं याच्या विनाश आठव रहाया १४६
प्रस्वापनप्रयोगीं रामाचे बाण ते जन पहाते
जे व्योमगत महीगत म्हणति सकळ जाणते जनेंप हा ते
प्रस्वापनप्रयोगो- पक्रम करितांचि साधु स्तर सारे
मज म्हणति पारिजातें हि-न लंघावी कदापि सुरसा रे १४८
नारद म्हणे करावा न प्रस्वापप्रयोग शांतनवा

१ आकाशगामीजनांला, २ तृणवत् तुच्छ केला आहे कल्पांतींचा क्रुद्ध सहस्त्रफणाचा सर्प जेणें असें तेज सर्वत्र कोंदे भरे, ३ मोहनास्त्र. ४ जनाचें पालन करणारे राजे-लोकपाल.
+ मुंगसवेल.

कां क्षोभलासि बहु तूं　जन्माचा शांत कीं न शांत नवा १४९
केशादि असो गुरु बहु　मान्यचि चित्तें हि लंघ्य न पत्याला
पूज्यचि दक्षमखांतक　जरि अस्थि भुजंग भस्म नसे त्याला
अवमान स्वगुरूचा　त्वां न करावाचि हा असामान्य
ब्रम्हण्य ब्राम्हण हा　लोकीं तापस नसे असा मान्य १५१
गुरुचरणावरुनि सदा　वोवाळुनि सांडिती असु ज्ञाते
सुज्ञा हरिहरसे जे　गुरुचरण न-मानती असुज्ञा ते १५२
ते गगनग अष्ट पुरुष　वदले देवर्षिवच न मोडावें
जोडावें यश भीष्मा　त्वां न प्रस्वापनास्त्र सोडावें १५३
तें ऐकुनि म्यां केलें　ब्रम्हास्त्राचें पुनः प्रदीपन गा
रामास भासलों मी　कल्पांतींचा जसा नदीप नगा १५४
राम दिसे वित्रपा तें-　अद्भुतचि जसा रवि प्रभा वमला
निंदूनि म्हणे कळला　आतांचि असार विप्रभाव मला १५५
जमदग्निप्रमुखपितर　रामातें म्हणति काय हा निकर
करसा तुज अनुचित हा　परधर्म स्व-पर-काय-हानिकर १५६
दिसतोसि शीतकरसा　हा समर-ग्रीष्म भीष्म हा तपन
हा तपनसा तसा तूं　परि म्हणवी सेवित्यासि हा तप न १५७
हा देव कीं सुरनदी-　नंदन आठांवरून अन्यतम
तुज जिंकुनि भीष्म जसा　वांचुनि झालासि तूंहि धन्यतम १५८

१ सदाशिव, २ नभोरूपअंबर - वस्त्र; नग्न, ३ न मान्य होतो. ४ सागर, ५ पर्वतास, ६ निर्लज, ७ चंद्र, ८ समर हाच ग्रीष्मर्तु त्यांत भीष्म हा सूर्य, ९ अष्टौवसूमध्यें कोणताही एक हा आहे. + ब्राम्हणभक्त., ‡ तापूनको.

+याचा मृत्यु ‡विधिविहित शक्रसुत नराऽवतार जो भीवी
पर शक्ति यापुढें जसि न रविपुढें दीपदीप्ति शोभावी १५९
सिंधूरि जेविं मानव बाहुबळें तेंवि यासि न पर तरे
येथुनि परत मग करुनि- हट मठ-सांडुनि कदापि न परतरे
राम निवृत्त न होतां म्हणति मला अगा साधो
तुज निजधर्मौदार्यें यश हें न स्वर्गगा-अंगा साधो १६१
राम तुजा गुरु याचा रक्षावा मान मानदा मानीं
बांधीं बाहुगुणांनीं दर्शी-वामा न मान दामांनीं १६२
वदलों क्षत्रिय मी कां परतेन प्रथम धर्म सोडूनी
राम म्हणे घ्यावी म्यां कीं शिष्यें हार हात जोडूनी १६३
न मना ये जें असरुतु कथिति पितर इतर नारदादिहि तें
क्रोधि हृदय गुर्व-क्षर मांडी कीं मूल लाडिकें लिहि तें १६४
झालों रणविमुख न मी विनविति जन्हि मुनि धरूनि मद्धनुतें
गुरु करवी विजय वळें करविति अनिवर्तिकीर्ति मद्धनु तें १६५
म्हणति भणति गुरुभति कर मज ने सूर्त आठ वेदेश
रामें प्रथम स्वधनु त्यजिलें तो नित्य आतवे देश १६६
मन्मातहि म्हणे रे हो न यशोहानि वारसा मन मी-
कितिनीरि रामजावूं निज पर्व्याचा हा निचारा राम नमी १६७
पहिल्यापारुनि गुरुवाक्- ग्रहणीं आदर मदीय कान मन

१ होणारा, २ माघारा फीर, ३ कल्पवृक्षाला, ४ बाहुरूपगुण-रज्जूनीं, ५ मद्-हनु- मार्जारहनुदली तें, ६ ज्यासहि न धनु तें, ७ हवन्ला, ८ आत्महिताच्या, ९ माझें, + भीष्माचा, ‡ ब्रम्हदेवानें नियमित, ‖ डाव्या उजव्या, ‡ दाव्यानीं, * ठिकाण.

मग धर्म-यशस्कर-गुरु चरणांसि करीन मी न कां नमन १६८
धांवुनि पाय धरितां आशीःसूक्तें सुखें वदे हातें
स्पर्शे माथा सद्गुरु निववाया दे सुखेंव देहातें १६९
प्रेमें असें म्हणे या- लोकीं या-भार्गवीं रविप्रतिमी
त्वां तेज मिरविलें बहु तेजस्वी न वदलों रविप्रति मी १७०
झाली व्हावी प्रीती श्रीदाच्याही न जी वितरणांत
करिती उदारजीविन ऐसेंचि न हीनजीविन रणांत १७१
मृत्युपरिस परिभवा- पासुनि बहु नचि भिती परि सेवातें
प्रार्थुनि मागति पुत्र- छात्रांपासुनि भले परिभवातें १७२
घे माझ्या आशी या सर्वाहितहरण बागुरा बाजा-
स्वर्वल्लिमंडपींच्या भवसिंधूंतील वा गुरा ज्यौं १७३
नमन पुरे संकोचा- सह अंजलि वसवसोहि सोडावा
ऐशाचि विजय समरीं अमरीला गावयासि जोडावा १७४
ऐसा प्रसाद मजवरि करुनि म्हणे राम काशिपतितनये
हळु हळु निजरसें म्हणतो शिव कां गे देवि काशि पतित नये
तैसेंचि म्हणत होतों शरणार्थी कां न येति चापलते
नारुचि निश्चयें जे जे कळवितिल स्वशत्रु चापल ते १७६
परि परमप्रबळ प्रति- बंधक विधि साचि आयगेय महा
नयैवर्तित्वें बाई दंडुनि गुरुसाहि विपाप गे यम हा १७७

---

१ क्षेमालिंगन, २ सूर्यसदृशी, ३ श्रीदेणारा-कुबेराच्याही, ४ दानांत, ५ शिष्य, ६ शत्रुहारिणाचें जाळें, ७ स्वर्गातील वेलीच्या मंडपामधील वाजा, ८ नौका, ९ धारू, १० देवांगनाला, ११ धनुष्यवल्लीला, १२ दैवसा, १३ भीष्म, १४ नीतिनें. + शंकरातें, ※ आशी.

मज जिंकिलें नदीजें  न चले बळ यापुढें तिळहि माजें
हिमजित होय रविमहहि  वरचि तमापरि भयें बिळ हिमाजें १७८
भीष्मपराभव न घडे  शाल्व तुला शरण आणु सांग मला
कीं काळा जिंकूं जो  हरिणा हरिराचि माणुसा गमला १७९
अन्या धन्या गति तुज  नाहीं जा जान्हवीसुता शरण
अक्षम करावया या-  वीरासी सूर्य शशि हुताश रण १८०
अंबा म्हणे शरण मी  जाईन वना न या भरतपातें
करिन सहाय वधाया  याला घालूनियां भर तपातें १८१
यापरि वदोनि गेली  मन्मथनाथें स्वयें तप कराया
उपशम परम मधुर परि  लागे केवळ तिला सपर्क राया १८२
रामहि मला पुसोनि  प्रेमें मजवरुनि हात फिरवूनी
जाय महेंद्रागिरिप्रति  विश्वांत गुरुप्रसाद मिरवूनी १८३
येतां स्वपुरा करिती  बहु वंदी पौर कवि मम स्तवन
गाजविति मयूर जसे  गर्जुनि मेघो-दयीं समस्त वन १८४
क्षतशत पाहुनि पावे  सत्यवतीचीहि फार तनु कृपा
किं-बहुना गंगेची  मजवरि तितुकी नसेल अनुकंपा १८५
मद्वधकामें अंबा  करिती झाली वनीं बहु तपाला
जी स्वल्प पवन सेवी  सेविल ती काय हो बहुत पाला १८६
वर माग लागलिस बहु  देतों मीं वर नतासि अंबे शें
यापरि वदोन केली  धन्या संन्यासियांत अंबेशें १८७

---

१ शीतानें जिंकलें, २ सूर्याचें तेज, ३ गंगापुत्राला, ४ अग्नि. ५ भीष्मानें, ६ भाट ७ कृपा, ८ पार्वतीरमणें शिवें, + शेंकडो. ∗ अर्चित.

असती विवेकमति तरि मिळती परमा गती परि भवातें
माझ्या अंबा झाली जोडुनि कर मागती परिभवातें १८८
ईश्वर म्हणे दिलें जा ऐक नृपा ती प्रभूसि जें वदली
काय शुका मदिराक्षी खदिरा क्षीणत्व दे ग्णीं कदली १८९
देव म्हणे द्रुपदसुता आधीं होसील पुरुष मग जा गं
निजबिरुदरक्षणीं हा प्रभु जेविं न तेविं अमर-नग जागे१
हा वरदवरसमर्पित मज हितकरचरमुखें कळे वर हो
देव विनविला म्यां कीं पात्र अपयशा न हें कलेवर हो १९१
होतां अंतर्हित तो वरदेश्वरसर्वभक्तहित रचिता.
स्वचिता रची स्वयें ती उग्रमति रचील कोण इतर चिता १९२
यमुनातटीं चितेला पावक ती आपुल्याचि दे हातें
मद्वधसंकल्प करुनि होमी हो मीनदृष्टि देहातें १९३
मद्वधकाम द्रुपदहि उग्रतपें ईश्वरासि आराधी
त्याला हि भक्तवत्सल भेटे नसतांहि शांतिसारा धी १९४
स्त्रीपूर्व-पुत्र दिधला ऐसें वर मागतां वदे वरद
न करी विचार द्याया विचकूं दे याचका न देव रद १९५
द्रुपदपुरीं पुत्रोत्सव- परिपूर्ण घरोघरीं भला गाजे
पुत्री म्हणोनि नारद- मुनि कळविति तेंचि चर मला गाजे
ठेवी नाम शिखंडी हें वर्णूं काय बा रसें गातें
अद्यापि बंदि मागध सूतांचें वृंद बारसें गातें १९७

१ कल्पवृक्ष. २ नेत्रीं मिटून; ३ दंत; ४ गाजे-चर-सेवक मला कळविति.

खेळविल्या बहु भूपा उचिता पुत्राचिया शरीरा ज्या
किंबहुना द्रुपदमतें राजसुतेला हि ती वरी राजा १९८
वरिली या द्रोणाची चापश्रुति मग दशार्णपतिकन्या
ती शयनीं समजे कीं प्रकृति स्वसमा[1] असे नरी अन्या[2] १९९
धात्रीस ती म्हणे हित होतें जरि तात कापिता मान
मानस म्हणतें मज कीं न असा या घातका पिता मान २००
कळतां हिरण्यबाहु क्षितिपाळ म्हणे रुता असाव्या ही-
इच्छा अरिसहि नाशवो न मिळाला मदितरा[3] असा व्याही २०१
द्रुपदाच्या मथनार्थ स्वचमूची[4] शीघ्र सिद्धता करवी
ती सज्ज होय दधिचें जेविं करायासि सिद्ध ताक रवी २०२
भ्याला पांचाळ म्हणे देवा पसारिति सुरद्रु[6] पदरा ज्या
त्या तवकरें करावें यापरि चिंतातुर द्रुपद-राज्या २०३
स्त्रीस म्हणे वदलीस प्रामवराचा धरुनि विश्वास
लग्न कराचि प्रभुवर यश विदित असे अतर्क्य विश्वास
ठावें असोनि सर्वहि पतिच्या खोलींत कोंडवा सून
ऐसें स्वससख्यांपासीं कांगे वदलीस तोंड वासून २०५
सद्यः स्वदुर्दशा हे जरि नाइकतां त्वदुक्ति कां होती
यापरि विटंबिली जी न करील महत्वहानि कांहो ती
स्वस्य रहा मुलि देवूं प्राण परि न तुज दशार्ण-वसुधा-पा

---

१ आपल्यासारिखी, २ दुसरी-पुंस्त्वनाहीं, ३ मजहून दुसऱ्याला, ४ सेनेची, ५ तयार, ६ कल्पवृक्ष, ७ तुझ्या हातें करावें काय, ८ तात्काळ, ९ दशार्ण-वसुधा-प-दशार्णपृथ्वीपतिला.

तारिल दशाब्धिविषपा ईश्वर मारील दशार्णव सुधाया २०७
स्वनिमित्त प्राप्त असा होतां सर्वस्वनाश जनकास
घाली शिखंडिनी-तनु टांकाया दृढ करूनि मन कास २०८
ती जाउनि विजनेवनीं निज नवनीतातिमृदुलवपु सुकवी
कीं तप संकट चुकवी ऐसें सर्वत्र सांगती सुकवी २०९
पाहे स्थूणाकर्ण त्र्यक्षसखानुचरवर तिला स्ववनीं
आग्रह करुनि पुसे कां दिससी विटलीससी निजावनीं
ऐकुनि दुःख म्हणे तुज उचित नव्हे यास्वजीवितीं रुसणें
स्वस्त्रीत्व हें मला दे माझें पुरुषत्व सर्व घे असणें २११
अतिदुर्लभ जें मिळतां कां हो न करील मान्य सांगा तें
आंगानें त्याच्या ये योषात्व तिच्याहि पुंस्त्व सांगातें २१२
जायाचें भूषणसें घेउनियां पुरुषचिन्ह मिरवाया
परतोन ये पित्याचा - आधिगिरि सुखार्णवांत विरवाया २१३
द्रुपद-नृपति-हृदयींच्या दुःसह चिंता-स्वरूपसांगेतें
होय अयश्चुंबक जें यक्षवेंप्राप्त स्वपुंस्त्व सांगे तें २१४
दूतमुखें द्रुपद म्हणे बालिश हो नीट पारखा याला
अंगारभुक्चकोरें पण न करावाचि पार खायाला २१५
कुपितें त्या हेमभुजें पुरुषपरीक्षास्मृती न आठविल्या
पोरी नव्या नव्या नर- पतिसुतवेषें सजूनि पाठविल्या २१६

---

१ दश-अब्धि-विषप-दहाविषसमुद्रपिणारांस, २ निर्जनअरण्यांत, ३ लोण्यापेक्षाअतिमृदु शरीर, ४ ज्ञानी, ५ त्रि-अक्ष-सखा-अनुचर-वर-त्र्यंबक सखा कुबेर त्याचा सेवकश्रेष्ठ, ६ निजप्राणरक्षणीं, ७ स्त्रीत्व, ८ सुखसागरांत, ९ लोहचुंबक, १० यक्षापासूनप्राप्तझालेलें, ११ अंगारभक्षणकरणाऱ्याचकोरपक्ष्यानें, + मागणीचें, ❋ चिंतारूपसांगेस, सांग:(फांस्यासारिखेंवस्त्र)

रडुन्या एकेशिंग्या वरि बहुशिंग्या करुनि हातेणें
जो मंदुरें न होतो गोंधळ केला प्रकार हा नेणें २१७
पेटे दशार्णभूपति परि न द्रुपदाननाकडे पाहे
वाहे कन्यारति श्री वाहे क्ष्मिकोटिकीर्तिला वाहे २१८
सासूसि सासऱ्यासहि सुनशान-सत्कार्य होय जामाता
विहिणी व्याख्याकर्वी धुवविति निजपादे-तोय-ज्या माता
ऐसा अवगत आहे वदा मज ईश्वरा समाचार
सर्वहि कळवित होतें मज वदा ईश्वरासमा चार २२०
त्या यक्षाचा आला प्रिय सेवक म्हणुनि धनदसदनातें
स्त्रीभावास्तव लज्जित होवुनि तो दारवर्ती न वदनातें २२१
धनद म्हणे हर्षप्रद दासाला जोवि हा तसा मोरा
धनाहि नरं न्यूण न कां आला जोडूनि हात सामोरा २२२
देउनि पुरुषत्व स्त्री झाला दावावया मुखा लाजे
ऐसें यक्ष कथिनि बहु बाहुनियां पावले सखाला जे २२३
धनद म्हणे हा मंदा केलें चलतोंचि हें कसें स्वमनें
गमतें पुरुषत्वीं न स्त्रीत्वीं च स्वांत बहु तुझें रमनें २२४
स्त्रीत्वचि असो अशा या मूढाला अन्य काय शासन हो
न्यूनत्व लेशमात्र द्रुपदाच्या कन्यकायशास न हो २२५
विनवुनि शापांतार्थ स्वामीचें वळविलें मन दहांनीं
बहु खवळला हि न करी सत्प्रभुचा कोप अमृतनद हानी २२६

---

१ अश्वशाळेंत. २ द्रुपद-आनन, मुख, ३ आपल्यापादकमलास, ४ कुबेरग्रहास, ५ हा मी, ६ अंतःकरण,

शिवसख[1] म्हणे शिखंडिस मारिल पावेल मरण जेव्हां हो
गेलें स्वरूप त्याची प्राप्ति पुन्हा याकुंधीस तेव्हां हो २२७
होउनि कृतकार्य पुन्हा पुंस्त्व जयाचें तयासि ओपावें
म्हणउनि ती गेली कीं अभिलाषें ईश्वरें न कोपावें २२८
यक्ष म्हणे राजसुते जा यावज्जीव तूं असीच रहा
मत्स्वामीनें अथवा लहे यानेंचि तुज दिला वर हा २२९
कवडी दुर्लभ ज्याला मोत्यांच्या जेथिं राशि खंडीची
पुंस्त्वप्राप्तिकथा हे कथिली तुज नरवरा शिखंडीची २३०
यास्तव म्हणतों आम्ही द्वाणूंना[2] वायकांस हातेरें
कारिती सर्वस्वाचें परि न यशाचें रूबुद्धि मातेरें २३१
स्त्रीतुल्य स्त्रीनामा स्त्रीपूर्व स्त्रीस्वरूप हे तीन
या चौघांवरि आम्हा- दृढसंधाची[3] उठेल हे ती[4] न २३२
ऐसे शांतनवाचे साचे परिसोनि बोल कानाहीं
सभ्य म्हणति गंगासुत- सम गोरीसुतहि बोलका नाहीं २३३



## अध्याय १४

राजा वधाल पांडव बळ कितिदिवसां असें पुसे भीष्मा
द्रोणा कृपा गुरुसुता कर्णासहि रिपुचमूनदी भीष्मा १

---

१ कुबेर, २ शूद्रास, ३ दृढप्रतिज्ञाज्यांची, ४ तलवार.

भीष्म म्हणे राजा मी मारिन पांडवबळास मासानें
द्रोणहि असेंचि सांगे वृद्ध म्हणुनि निजबळा समारानें २
आचार्य कृप म्हणे हो द्यावे मज दोन मास या काजा
गुरुसुत म्हणे दशदिवस बहुत म्हणाया परोसि नाका जा ३
कर्ण म्हणे या कामा पांच दिवस बहु कशास दिवस दहा
शिवशिष्य ज्यांस म्यां उक्त न करितां म्हणेल शिवसद हा ४
भीष्म म्हणे रे उडणें विसरे हरिहय-कृष्णसार थिनें
तोंवरि उड राधेया जोंवरि नपहारि कृष्णसारथिनें ५
हें चारकथित वृत्त प्रातःकाळींच साधुराय कवी-
धर्मनृप अर्जुनास स्वमुखें कृष्णासमक्ष आयकवी ६
आपणहि म्हणे वीरा रिपुवधकाळ प्रमाण सांग मला
कुरुबळसिंधु सुरांसहि दुस्तर केवळ न माणसां गमला ७
अर्जुन म्हणे प्रभो बहु थोरचि ज्यांच्या अशा प्रतिज्ञा तें
परि पावति धर्मबळें न तदितर बळें यशा प्रति ज्ञातें ८
इतुकें वदोनि पाहुनि मेघश्यामाननाकडे डोले
पुसतां प्रमाण तरि अरि वधिन निमेषांत मी असें बोले ९
किति कुरुबळ भस्म करिल जग पाशुपतज्ञ हा निमेषांत
हरि कोपतां गजांत हि शिरती मग कां न हानि मेषांत ११ १०
जें स्वयम्भुरारी धरितें मजसी हें तेंचि पाशुपत नातें

१ संक्षेपानें, २ अश्वत्थामा, ३ शाकूला, ४ स्वर्गी, ५ शिघ्यानें, ६ सिंहावलोकित कावळीट, ७ थांडे, ८ सेवकांनीं सांगितलेलें, ९ अर्जुनानें पुसतां कृष्णानें अनुमोदन दिलें, १० पाशुपतास्त्र जाणणारा, ११ मेंढ्यांत.

पावेल ब्रम्हांडहि यामत्तेजेंचि आंश पतनातें ११
जळतिल खळ देवा जरि करशील कटाक्षपातही रागें
किति खळबळ जोडावें भंगभयें यांसि हात हीरागें १२
म्हणतो सर्व कार्या- हूनि अतिअवश्य कार्य भीम रणा
भीतो अयशा न तसा हा मानि बळींद्र आर्य भी मरणा १३
भुरनिल याभवदाज्ञा देवीसिंहापुढें अरातिकरी
भीमाकडे नरचमू मुख जेंसें रविकडे न राति करी १४
नकुळ सहदेव सात्यकि धृष्टद्युम्नादि वीर हे राया
तेजस्वी रवि यांसि न धरितिल खळ घूक धीर हेराया १५
केला शुष्क समुद्र क्षणहि न भरतां अगस्त्यपाणितळें
रक्षील स्वबळानें त्यापासुनि काय जो स्वपाणितळें १६
या कृष्णसखोक्तीनें धर्मात्मा धर्म होय मानघना
कीं तें पुराणमुनिता वदवी वदवील काय मानवता १७
सिद्ध कुरुक्षेत्रीं ते सर्वहि झाले करावया समरा
राजे अन्योन्य म्हणति सफळ रणमरणा करावयास मरा १८
जनमेजयासि ऐसी वैशंपायन कथी कथा तीतें
गाय मयूर रसिककवि- किंकर चित्तें असत्पथातीतें १९
खवरविरचित गुरुवरें हें भारत लिहविलें मयूरकरें
मुनिरचित मयूरवर देवकरें हापरांत जेविं हरें २०

---

१ लवकर, २ हीरकपर्वतानें, ३ शत्रुरूपहत्ति. ४ रात्र, ५ रसिक कवींचा सेवक, ६ असत्-पथ-अतीत-कुमार्गसोडूनजाणारें.

# उद्योगपर्वांतील कथानकें.

अध्याय १ आर्या संख्या ५९ यांत विराटसभेंत सर्वांनीं विचार करून सामकरण्याविषयीं दुर्योधनाकडे निरोप पाठविला. युद्धार्थ कृष्णास आमंत्रण.

अ. २ आ. सं. ६६ शल्याचा सत्कार. नहुष चरित्र.

अ. ३ आ. सं. १०८ यांत द्रुपदगुरूनें दुर्योधनादिकांस हितोपदेश केला. धृतराष्ट्र दुर्योधनास उपदेश करतो. संजय पांडवांकडे जातो. संजयाबरोबर निरोप उलट येतो.

अ. ४ आ. सं. ११९ यांत सर्वांसमक्ष संजय निरोप सांगतो दुर्योधनादि त्याचा धिक्कार करतात. पांडवांचा बेत धृतराष्ट्र विचारतो.

अ. ५ आ. सं. १११ संजय पांडवां कडील वर्तमान सांगतो दुर्योधनाचा गर्व.

अ. ६ आ. सं. ५० धर्मराज कृष्णास संधी करण्यास कौरवांकडे पाठवितो

अ. ७ आ. सं. ९९ यांत कृष्ण हस्तनापुरास जाऊन सर्वांच्या भेटी घेतो.

अ. ८ आ. सं. १०५ संधी विषयीं कृष्णाचें भाषण.

अ. ९ आ. सं. ९९ कृष्णाच्या बोलण्याचा तिरस्कार दुर्योधनास आमांचा बोध. कृष्णास बांधण्याची मसलत.

अ. १० आ. सं. १०८ कृष्ण आपलें विश्वरूप दाखवितो संधी न होतां कृष्ण रागानें निघून जातो. कृष्ण कर्णास वळवाव्यास पाहतो

अ. ११ आर्या सं. १२३ यांत कुंती कर्णास भेटते. दुर्योधनास बोध. दुर्योधन युद्धाची तयारी करितो.

अ. १२ आ. सं. १०१ दुर्योधन धर्माकडे उलूक पाठवितो. पांडवांकडील तयारी. उभय सैन्यांतील वीरांचें वर्णन.

अ. १३ आ. सं. २३३ शिखंडीची उत्पत्ति. भीष्म परशुराम यांचें युद्ध

अ. १४ आ. सं. २० शत्रूचा वध कोण किती दिवसांत करील याचा विचार. युद्धाची सिद्धता.

---

# उद्योगपर्वांतील पाठभेद.

| पृष्ठें | पंक्ति | | |
|---|---|---|---|
| २ | १० | राज्यपदीं बसवितें | राज्यपदीं बसविनां |
| १३ | १३ | आनि रतिदा ससीच. | आनि रतिदा नसीच |
| २५ | १२ | पुरुष-परीक्षा कळे जयासि वरी. | पुरुष-परीक्षा कळे नज्यासि वर्ग. |
| २६ | १० | नसे असी कांहीं | नसंचि असि कांहीं |
| २७ | ५ | तेहि मंदेश | तोहि मंदेश |
| ६३ | १ | श्रीकृष्णा श्रीकृष्णा | श्रीकृष्णा नीकृष्णा |



# शुद्धिपत्र

| पृष्ठें | पंक्ति | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १ | १५ | अगाँ.गमाँ, | अगा.गमा, |
| ,, | १६ | अगारा मा | अगारां मीं |
| ,, | १८ | ४ कर, हारलेलें द्रव्य; | ४ बलवंतानें हरण केलेलें द्रव्य |
| ,, | ,, | ९ वक्रमनाचानें | ९ वक्रमनाच्यानें, |
| २ | २ | धर्म युद्धं | धर्म- युद्धं |
| ,, | ३ | भिरवूं- | भिरवृ- |
| ,, | ६ | छर्त्नं | शर्त्नं |
| ,, | ,, | पद- नमुनी | पद; नमुनी |
| ,, | १८ | ३ कपटें घूनें-कपटादुर्योधनानें | ३ कपटद्यूतानें |
| ,, | १९ | ८ महन् प्रयास | ८ महाप्रयास |
| ३ | ८ | अंधाचें | अंधाचें |
| ,, | १९ | १७ वंध्या- उरसिज- वांझीच्या स्तनांस | १७ वंध्या- उरसिज- वांझेच्या स्तनास. |
| ,, | २० | ११ वेरीगसमुदाय | ११ वेरिसमुदाय. |
| ४ | २ | प्रेषि | प्रेषी |
| ,, | १० | मार्नी | मानी |
| ,, | १५ | - सूर्यी समांरगा- | -मोरगा- |
| ,, | २२ | १२ मस्तकीं, | १२ मस्तक |
| ,, | ,, | वैश्याच्या मांडिवर | - वैश्याच्या मांडीवर |
| ,, | ,, | १५ पूर्वी आलेल्याचें साह्यकरणारा जो शिव त्याचे चरणीं | १५ पूर्वी आलेल्याचें साह्यदाच शिव त्याचें चरणीं. |
| ५ | ५ | पाद्दा नानें; | पद्दा नानें; |
| ,, | १५ | त्वद्रूपयैक | त्वद्रूपयक |
| ,, | १६ | परिसि, त्या हरिसिं, त्या. | परिसत्या हरिसत्या |
| ,, | १७ | दुष्कररमा | दुष्करेमा |
| ,, | २० | - टाकिलें आहे शस्त्र जाणें | - टाकिलें आहे शस्त्र ज्याणें |
| ,, | ,, | - सुदैव आणि दुर्दैवाचें संपर्काच्या ओघांस; | - दुर्दैव आणि सुदैव यांचें संपर्काच्या ओघांस; |
| ,, | २१ | ६ कमळ | ६ कमळिणी |
| ६ | १ | तुर्झीं | तुझी. |

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ७ | ६ | अगेंचि | अगेंचि |
| ,, | १३ | १ माण | १ प्राण |
| ,, | ,, | २ वाटे | २ चेष्टा |
| ,, | ,, | – अर्जुनाचा, अग्निचा | ३ अर्जुनाचा अग्नीचा |
| ,, | ,, | ६ सुयोधनाग | ६ कृष्ण, |
| ,, | १७ | X सोपें | X सोपें |
| ८ | ४ | ज्ञाल्यांचेनिवास | ज्ञाल्यांचे निवास |
| ,, | ५ | ने स्वोद्यानींच- | ने स्वोद्यानींच- |
| ,, | ,, | त्यांच्या | त्याच्या |
| ,, | २० | ९ सुखदेणाऱ्यास | ९ सुखदात्या, सुखदेणाऱ्या |
| ९ | २ | सेनाचा | मेनांचा |
| ,, | १३ | साधुं-भद्रे | साधु-भद्र |
| ,, | १९ | तुज आशिर्वाद | तुज आशीर्वाद |
| ,, | २० | ४ यम-संभ्रम | ४ धर्मादर; |
| ,, | २१ | ८ साधावयाग | ८ उत्तम कल्याण. |
| १० | ६ | वाहें" | वाहें" |
| ,, | १६ | उत्सवपळे, बळावी तापिंमुनि त्रिदशांचिनरू पहुडे | उत्सवपळे, बळावी ताप मुनि त्रिदशा-चिन्तरूप-हुडे |
| ,, | १९ | बळला | वळला |
| ,, | २० | २ आशिर्वाद | २ आशीर्वाद |
| ,, | २१ | ७ दैव; | १७ दैव; |
| ,, | २२ | १३ कल्पतरूस | १३ कल्पवल्लीस |
| ११ | ८ | सुरऋषिहि | सुरर्षिहि |
| ,, | ,, | नभलागे; | न भला, गे |
| ,, | १५ | आशी देउनी | आशी देऊनि |
| ,, | १९ | मग मीं करीन | मग मी करीन |
| १२ | १० | जोत्स्ना | ज्योत्स्ना |
| ,, | २० | जोत्स्ना | ज्योत्स्ना |
| १३ | ४ | न तुह्मीं हरि. योग्यतेंहि नरमेला | न तुह्मीं, हरि, योग्य तेंहि न रमेला! |
| ,, | १० | नदृष्टिपुढें | तदृष्टिपुढें |
| ,, | १५ | पक्षीप्रियार्थ | पक्षिप्रियार्थ |
| ,, | २१ | ८ ज्ञानें | ८ हेथुद्धिमति |
| १४ | ४ | ऋषि यानी | ऋषि-यानीं |

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १४ | १२ | तेज्यानें | तेजानें |
| " | १४ | विप्र शिर्गं | विप्र-शिरीं |
| " | २२ | १३ साधूंस जयदेणारें | १३ उत्तम जयदेणारें |
| १५ | ६ | धर्मनयविहीना! काय | धर्मनयविहीना काय?- |
| " | १३ | -धर्म न्याय नाहीं ज्यांत; | -धर्म न्याय नाहीं ज्यांत अशाला |
| १६ | ४ | सहस्त्रा-सभ | सहस्त्रा-सम |
| " | ११ | जो बोले | जों बोले |
| " | १२ | कर्ण ह्मणें, | कर्ण ह्मणे, |
| " | १५ | अर्थकर न्याय समय | अर्थकर न्याय समय |
| " | १७ | मारुनिकीं | मारुनि कीं |
| " | " | अलांघु बळें | अलाबु-बळें |
| " | १२ | १० भोंपळा, | १० भोंपळ्याच्या बळानें |
| १८ | ६ | जो पार्थपरा भवीं | जो पार्थ-परा भवी |
| " | १३ | सुज्ञा! मद्वचनें | सुज्ञा! मद्वचनें |
| १९ | १६ | शीघ्र संधि | शीघ्र संधि |
| " | १७ | इर्छा | इच्छी |
| " | २१ | ८ संधिकरणाच्या पक्षांस | ८ संधि-कर-वि-इन-संधिकरणाच्या गरुडास |
| २० | ४ | यौवनहि | यौवनहि, |
| " | ९ | भरन-कुळ-गुरुंच्या | भरत-कुळ-गुरुंच्या |
| " | १० | कुळज्या यशाचि | कुळजा यशाचि |
| " | २० | ४ रणन-मणि-नूपुर-यौवन वाद्यायमान मणिनूपुरांनीं शोभायमान् तरुणपण | ४ रणत्-मणि-नूपुर-यौवन-वाद्यायमान् मणिनूपुरांनीं युक्त आहे यौवन (तरुणस्त्रियांचा समुदाय) ज्याचे ठायीं असें |
| " | २२ | १० कुलिनास | १० कुलीनास |
| २१ | १६ | ने न भले | स्तेन भले |
| | १८ | जा सांग, वहूनें | जा सांग; वहूदनें |
| २२ | ७ | उन्न मन्ना | अन्न मना |
| २३ | ११ | ४ भाषण | ४ निरोप |
| २४ | २ | स्वस्थ आहां | स्वस्थ अहां |
| " | ५ | निडकुनि येउनि, | निकडुनि येउनि, |
| " | १२ | निवर्वू मज | निबवू मज |
| २६ | ४ | पुरुप-प्रयत्न | पुरुष-प्रयत्न |

| पृष्ठें | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २७ | १२ | न गदा हे | नगदा हें |
| २८ | ११ | खल तुम्हि दहां | खल तुम्ही दहां |
| ३० | १२ | हा क्षत्र-धर्म-निष्ठ | हा क्षत्र-धर्म-निष्ठ |
| ३१ | १ | भंग- जनक शापालें | भंग-जनक-शापानें |
| " | ४ | मारुनि भंग | मारुति- भंग |
| " | १२ | गंधर्व बद्ध- | गंधर्व- बद्ध- |
| " | १७ | भरतर्षभ! सत्यसार वदलां- हो | भरतर्षभ सत्यसार वदला हो |
| " | २० | ३ राजसेवक | राजेलोक |
| ३३ | ७ | ते ज्यानें | ते जानें |
| " | ८ | न ज्यानें | न जानें |
| " | ११ | - कर्मीर- शमन | -किर्मीर- शमन |
| " | २१ | ८ ब्रह्मांड | ८ ब्रह्मांड |
| ३४ | २२ | ८ निषेध, | ८ निषेधास, |
| ३५ | १ | विश्वास | निःश्वास |
| ३७ | ९ | शैल्य | शल्य |
| ३८ | ११ | कोणाचा आचरतां | कोणाचें आचरतां |
| ३९ | ११ | न तुटनिल | तुटनील |
| ४० | १ | यदुज्या | यदुजा |
| ४२ | ६ | गडबड गडबड | गडबड बडबड |
| " | १० | आछादुनि | आच्छादुनि |
| ४३ | ७ | रे.जेहि | राजेहि |
| " | १३ | नवरे ! घेतें | नावरे ? घे तें |
| " | २० | १ आपण अभ्यसन केलेल्या अस्त्राची | १ मु. अभ्यस्त- अस्त्र- सांग- ल्या अभ्यासलेल्या अस्त्राची |
| ४५ | ५ | गांधारि म्हणं | गांधार म्हणे |
| " | २० | कलहें कळनिल | कलहें गळनिल |
| ४६ | ४ | भलि प्रतिज्ञा | भली प्रतिज्ञा |
| " | १५ | दंनें, न करूनि | देनें, न करूनि |
| ४७ | ११ | करें, यल हें | करें, बल हें |
| " | १२ | त्या मारवावया कलहे | त्यां मारवावया कलहें |
| ४८ | ४ | "ह्री, सत्य, | "ह्रीं, सत्य, |
| " | ११ | सर्वस्व तेजें, | सर्वस्व तेज |
| ४९ | २ | यदुद्वहा | यदूद्वहा |

| पृष्ठं | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ५९ | ७ | सर्छी ह्मणवि | सच्छ्री ह्मणवि |
| " | ८ | शरण मरण भय तरोन जाईन | शरण मरण भय धरोन जाईन |
| " | ९ | सुयश तरोनी | सुयशें तरोनि |
| " | १४ | गांधारी | गांधारि |
| ५२ | १५ | नग जा | नरा ज्या |
| ५३ | ८ | नवसावासि | न वसावासि |
| " | २० | ८ रोगपरिक्षा समर्यी | ८ रोगप्रतीकार समर्यी |
| ५४ | २ | तुजा प्रनिज्ञा त्या | तुझ्याप्रतिज्ञा त्या |
| " | ७ | पद्माशील | पद्मा शील |
| " | ८ | पद्मा शील | पद्माशील |
| " | १४ | काय तुजा | काय तुझा |
| ५५ | २ | तुजी न समर्यी | तुझी न समर्यी |
| " | १९ | १ आश्रित-भव्य | १ श्रित-भव्य |
| ५६ | २ | उचितज्ञ | उचितज्ञ |
| " | १० | रवचले रवनगें मगन | रवचले रवें नगें मग न |
| " | १८ | जाणोनि ह्मणे मुकुंद | जाणोनि ह्मणे मुकुंद |
| " | १९ | ५. आकाशस्पर्शी पर्वत | ५. पर्वत |
| ५७ | १४ | मनुयोजन ग्रामीं | मनुयोजन गामी |
| " | १६ | अर्पावी | अर्पावीं |
| " | १७ | २ यावया | २ मयूरशब्दांनीं |
| " | " | ३ व्याधाचे | ३ फांसे गाराचे |
| " | " | ४ सुवर्ण रवचित वस्त्र | ४ पदक आणि वस्त्र |
| ५० | ९ | -दीपा-हेणा प्रभा-वज्ञा | -दीपाऽहेर्णा प्रभाःवज्ञा |
| ६१ | ११ | मूर्त्तें होवूनि | सुज्ञें होऊन |
| " | १२ | दास होवुनि | दास होउनि |
| " | १६ | वर्णू प्रिय फार | वर्णू प्रिय फार |
| " | १९ | महांभाग | महाभाग |
| ६२ | ७ | मह्लाळक ते तुझें | मह्लाळक जे तुझें |
| " | १४ | जे ह्मणनि | जे ह्मणती |
| " | २० | १ भाला- शस्त्रधारी | १ भाला ज्याच्या हातांत तो |
| ६३ | ७ | १भजनातें | भजनांत |
| " | ८ | जनातें | जनांनें |
| " | १५ | व्यसन- मळें धर्म- पाद-तळ | व्यसन-मळें धर्म-पाद- तळ |

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ६४ | १ | देवुनियां | दे उनियां |
| ,, | १३ | अक्रूरा-द्भूत बळभद्रा ग्रसेन | अक्रुरा-द्भुत बळभद्रो-ग्रसेन |
| ६५ | ९ | विदुरप्रेमेंजेवि ब्रह्मादि क- वि प्रसन्न यज्ञोनें | विदुर प्रेमें जेविं ब्रह्मादिक वि प्रसन्न यज्ञोनें |
| ,, | १० | प्रभुला तेविं नकरिनी व्या मादिक विप्रसन्न यज्ञानें | प्रभुला तेविं न करिती व्या मा: दिक विप्र सन्नय-ज्ञानें |
| ६६ | ८ | कळनील | वळनील |
| ६७ | १ | तूर्यरवेंकरूनि | तूर्य-रवें करुनि |
| ,, | ७ | सभेंत न भीं | सभेंत नारीं |
| ,, | ८ | महामुनी क्षिप्र | महामुनि क्षिप्र |
| ,, | १९ | परिसति सेवावयास | परसरिति सेवावयास |
| ७१ | १२ | उद्धतरे | युद्धतरे |
| ७२ | १५ | होऊनि जाय | होउनि जाय |
| ७४ | १३ | श्रुति-ज्ञान | श्रुति-ज्ञात |
| ७५ | १२ | बाहुला वाहें | बाहुला वाहे |
| ७९ | १८ | -गुरुक्तिला सुरपि मानी | -गुरुक्तिला सुरपि मानीं |
| ८० | ५ | सुरर्षि- मूखें | सुरर्षि- मुखें |
| ,, | १६ | भयानें | भयांत |
| ८१ | ५ | वृष-मुखें | वृष- मुखें |
| ,, | ७ | प्रज्ञितां कथीं | प्राज्ञितां कथीं |
| ८२ | १६ | येईल कापावयासि | येइल कापावयासि |
| ,, | १८ | तेव्हा जेव्हां | तेव्हां जेव्हां |
| ,, | १९ | जें धन धूर्तें | जो धन धूर्त |
| ८३ | २० | ४ कार्यभार वाहणारा रथा- चा धूर वाहणारा | ४ कार्य भार वाहणारा-प्र वीण. |
| ८४ | १८ | सत्समनि पासुनिहि | सत्सत्यनिपासुनिहि |
| ८५ | १८ | -क्र-गतां:सि | -क्र-गंतासि |
| ८६ | ९ | प्रसुवनि सुत | प्रसउनि सुत |
| ,, | २३ | १० मुख्यासारिखा | १० मुक्यासारिखा |
| ८७ | १८ | सुधीनि सुनर | रसि सुनर |
| ८८ | ५ | नं इंगितज्ञ- | न इंगितज्ञ- |
| ,, | ११ | सुख-कीर्तिच्या घटक बंधा | सुख कीर्तिच्या घटक बंधा |
| ९० | ६ | राज्याची | राजाची |
| ,, | १० | कुवर पित्या | कुनर पित्या |

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ८९ | १७ | अरे येशो दनें. | अरे पशो देनें |
| ९० | २ | ह्मणत्येच सभा तुजसी | ह्मणते सभा तुज जसी |
| ९१ | ११ | दृस्यैशिरहि | दृस्य-[४] शिरहि |
| ९२ | १६ | यदुहूहू सतीनें | यदूहूहू सतीनें |
| ९३ | २ | वर्षों ऽष्णो-सह-जटिल | वर्षोष्णा-सह-जटिल |
| " | १६ | अन्यायाहूनि | अन्या याहुनि |
| " | १८ | न बुडो | न बुडे. |
| ९४ | ३ | प्रज्ञ इनर | प्राज्ञ इतर |
| " | ९ | दैन्यें सांग न | दैन्यें सां:गन |
| ९५ | ९ | भीमासि ह्मण | भीमासी ह्मण |
| ९६ | ४ | सांगा ह्मण | बागा ह्मण |
| " | ९ | कीं कृत्वा दर्शयनं प्राज्ञ | कीं-"कृत्वा दर्शयने प्राज्ञ" |
| " | २० | ३ किं-कृत्वा-दर्शयनं-प्राज्ञ-ज्ञानीं कृष्ण काय करून दाखविनो | ३ ज्ञानी करून दाखविनो. |
| " | २१ | ४ इंद्र प्रमुखानी पूज्यमान-पूजिना आहेत बाहू ज्याचे असा कृष्ण. | ४ इंद्र आदीकरून वीरश्रेष्ठ बिंाप त्याणीं पूजित आहेत बाहू ज्याचे असा कृष्ण-पृथ्वेंत्रिलोकांहीं पूज्य असा भाव. |
| ९७ | १ | कीं योगी | कीं पांथी |
| " | ३ | फळ लाजुनी | पळ लाजुनि |
| " | ६ | पिनी घट घट | पिती घट घट |
| ९८ | २० | ३ कसोटी | ३ परिसाची |
| ९९ | १६ | न कां मरणदानें | न का मरण दानें |
| १०० | १३ | श्वेन-गर्जी | श्वेत-[१२] गर्जीं |
| " | १९ | २ नदी-समुद्रानें | २ नदीनें |
| १०१ | १५ | १त्रमचिनू | १त्रम चित |
| १०६ | ९ | साक्षा त्वेद्दनवृनिकग या | साक्षात् त्वद्दनवृनि कारा या |
| " | २० | १ नूं दिलेली वृत्ती चालविणाग | १ नूं दिलेली वृत्ती यालासाक्षात् कारा होय |
| १०७ | १२ | हूव्यास | हू व्यास |
| " | १३ | हू व्यास | हूव्यास |
| " | १७ | त्यादूतोपक्रमींच | त्या द्यूतोपक्रमींच |
| १०८ | ११ | चारवोंनि जी | चारवोनि जी |
| १०९ | २१ | ९ उत्तमज्ञानी विदुर | ९ कविविदुरसम्यक् वदला |
| ११० | ३ | कृप शैल्य सैंधव | कृप शल्य सैंधव |
| १११ | | भिडले मजसीं | भिडेल मजसीं |

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १११ | १९ | निजसमाः क्षौहिणीच भू-<br>पाळ | निजगमाः क्षौहिणी-चमूपाळ |
| ,, | २२ | -इत्यादि शुभाशुभचिन्हें | - इत्यादि अशुभ चिन्हें |
| ११२ | २१ | ११ तीर्थाटनाविषयीं उद्युक्त | ११ तीर्थाटना विषयीं ____ |
| ११३ | १५ | कोण पडुवा | कोण पांडवा |
| ११६ | १० | एक फटकोला | एक फटेकाळा |
| ,, | १४ | तुझ्या तातें | तुजा तातें |
| ,, | २१ | ६ फटकळाला | ६ हे दुष्टा |
| ,, | ,, | ८ कचकण-केश | ८ केश |
| ११७ | ७ | सांगा या त्याला माज्याहि | सांगाया त्याला माझ्याहि |
| ११८ | ८ | न छळ | न च्छळ |
| ,, | ९ | कथा नीच्या | कथा नीचा |
| ११९ | ४ | असा धुनीज्याला | असा धुनी जाला |
| ,, | २० | हें मागें | हे मागें |
| ,, | २१ | ४ पक्षी | ४ इतरसर्वपक्ष्यांच्या वेगास |
| १२१ | २ | कृद्धाचें | वृद्धाचें |
| ,, | ११ | थोरपण मन | थोरपणं मन |
| ,, | १२ | रे नीच्या | रे नीचा |
| ,, | १५ | कुलभवो नीच्या | कुलभवो नीचा |
| ,, | २१ | ६ नीचसुलोत्पन्ना | ६ नीच कुलोत्पन्ना |
| १२२ | २० | ७ स- अंग- देह धारी | ७ सांग म्हणून धराल्यासारि-<br>खें शास्त्र आहे त्या |
| १२३ | १२ | स्वगुणरूपनेंज्यांनें | स्वगुणरूपनें जानें |
| १२५ | १ | आला नहूनें बहु | आला नहूनें बहू |
| ,, | ६ | सांगा तो धर्माला | सांगा तो धर्मभला |
| ,, | ७ | वन्यांसीं | वन्योंसी |
| ,, | ८ | ज्या अश्रमांत | ज्या आश्रमांत |
| ,, | १५ | अधिष्ठुनि असे | अधिष्ठुनि असे |
| ,, | १८ | ३ वनांतील तापसांशिं | ३ वनांतील तापसी मारखी |
| १२६ | ७ | नमदावरिती | नर्मदा वरि ती |
| १२७ | १७ | काय असें | काय असे |
| १३० | २० | २ हनी त्याचीस्त्री | २ हनी. |
| १३८ | ३ | युद्ध तांडव | युद्धतांडव |
| १४४ | १४ | मेधी-दर्या | मेघांदर्यी |
| १४७ | १२ | भूषणसें | भूषणासें |
| १४८ | १२ | धनहि नसे | धनहि नसे |
| १४९ | ६ | त्वद्दैयानेंचि | त्वद्दैयानेंचि |
| १५१ | ११ | स्वबलानें | स्वबलानें |